॥ वन्दे मातरम्. ॥

# अटकेचा झेंडा

## ऐतिहासिक गद्य नाटक.

हें पुस्तक

महादेव सखाराम दाते यांनीं

पुणें येथें रु. ना. कवडे यांच्या

शारदा छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०६.



किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.

ह्या नाटकाच्या संविधानकाचा प्रसंग इतिहासज्ञांच्या मतानें खरा नाहीं, असें जरी आहे तरी पेशव्यांच्या बखरींत त्या प्रसंगाचें वर्णन दिलें आहे, आणि जोपर्यंत तें कोणी कमी करीत नाहीं किंवा खोटें आहे असें प्रसिद्ध करीत नाहीं, तोंपर्यंत त्याला खरें मानण्यास हरकत नाहीं याच समजुतीनें मी ह्या प्रसंगावर प्रस्तुतचें नाटक लिहिलें आ ह्यांतील पुष्कळ भाग बखरी व इतिहासांप्रमाणें खरा आहे, तथ नाटकाला सारस्य येण्यासाठीं कांहीं भाग कल्पित घातले आहेत दल रसिकजन मला दोष देणार नाहींत अशी माझी खात्री आहे.

ह्यांतील मुसलमानी पात्रांच्या तोंडीं मी मुद्दामच मराठी भाषा घा आहे. कारण; हें कीं, सर्वांसच उरदु किंवा हिंदी भाषा येत नस नाटकाचें संविधानक समजण्यास कठीण पडतें, तेव्हां माझ्या ह्या कृत वाचकांचा विरस होईल असें मला वाटत नाहीं. ह्या नाटकाचा प्रयोग करणारांचे सोयीसाठीं त्याचे उरदु भाषांतराची हस्तलिखित प्रत मज- कडे मिळूं शकेल.

माझी ही अल्प सेवा आमच्या स्वदेशबांधवांस कितपत रुचते, हें पुढें कळेलच. उगीच प्रस्तावनेंतच आपल्या कर्तव्याचें दिग्दर्शन करून ती मोठी करणें मला प्रशस्त वाटत नाहीं.

ज्या जगदीशानें ही कृति मजकडून करविली, तोच ती लोकादरास पात्र करो, अशी त्याच्या चरणीं प्रार्थना करून मी इतकेंच पुरें करतों.

ता. ८ माहे आगष्ट }
सन. १९०६ }

आपला नम्र,
**महादेव नारायण कवडे.**

# अटकेचा झेंडा

[ ऐतिहासिक नाटक. ]

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**स्थळः**—नर्मदेच्या कांठची नानासाहेबांची छावणी.

( बाबुजीनाईक बारामतीकर व गोपाळ गोविंद बोलत प्रवेश करितात. )

**बाबुजीनाईकः**—काय, पानपतकडची हकीकत विचारतां ? अहो, गिलच्यांचा दम मोठा. त्यांच्या पुढें शिंदे आणि होळकर ह्यांच्या सारख्यानांहि खस्त खावी लागली, आणि भाऊसाहेबासारख्या धैर्यवान् व शूर पुरुषालाहि आतां आपला निभाव लागणें कठीण आहे असें वाटूं लागून त्यांनीं आपल्या सेनेभोंवतीं खंदक खणून घेतला. त्या खंदकाबाहेर कोणीहि मराठा पडेना. दुराणी तर सुजाउद्दवला, नजीबखान रोहिला आणि अहमदखान लंगडा पठाण ह्यासह एक लक्ष वीस हजार फौजेनिशीं भाऊसाहेबांच्या खंदकापासून अडीच कोसांवर तळ देऊन राहिला. मराठे सैन्यांनीं कच खाल्लेली, तरि गिलच्यांची प्रथम त्यांच्यावर चालून जाण्याची हिम्मत झाली नाहीं. शत्रूचें बळ न समजल्यानें अंगीं कितीहि सामर्थ्य असलें तरी एकदम चाल करवत नाहीं; तेव्हां गिलच्यांनीं तसें केलें ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. गिलचे कावे देत खंदकाभोंवतीं फिरूं लागले. त्यांनीं मराठ्यांची रसद बंद केली. भाऊसाहेबांनीं पुण्याहून मदत मागवावी परंतु ते प्रथमच 'नानासाहेबांजवळ प्रतिज्ञा करून गेले होते. मनुष्य एकदां अभिमानाला पेटला

ह्मणजे मग आपला कितीहि नाश झाला, फारतर काय पण प्राणावरहि येऊन बेतली तरी माघार घेत नाहीं. त्याचप्रमाणें भाऊसाहेबहि यावेळीं अभिमानास पेटले होते. रावसाहेब (विश्वासराव) अल्पवयी, पण कोण चाणाक्ष! त्यांनां भाउसाहेब मदत मागवीत नाहींत असें दिसतांच, जनकोजी शिंद्याचा विचार घेऊन सांडणीस्वाराबरोबर इकडे पत्र रवाना केलें.

**गोपाळ गोविंदः**—पत्र पोंचल्याबरोबर खासा स्वारीनीं निघण्याची तयारी केली असेलच?

**बा०ः**—पत्र, मी वाचित होतोंच कीं, "गिलचे यांचा पेंच भारी पडला. निभावणी होण्याचा प्रकार राहिला नाहीं. भाऊसाहेब तो अभिमानी पुरुष. यांतच गर्द होतील पण व्यंगोत्तर लिहिणार नाहींत. यास्तव संकटांत आणखी पन्नास हजार फौज व कोट रुपये खजीना, असें पाठवितां तरी तुमचीं आमचीं दर्शनें होतील, नाहींतर पत्रीं लिहिलें हीच भेट समजावी. नानासाहेब, आह्मां सारखे तुह्मांस पुत्र आहेत व आणखीहि होतील, परंतु भाऊसाहेबांसारखा बंधू मिळणार नाहीं." इतकें ऐकतांच नानासाहेबांच्या सर्व अंगावर दरारून घाम सुटला, डोळे पाण्यानें भरून आले, अंग थरथर कांपूं लागलें, त्यांना एक शब्दही बोलवेना; तसाच तो दुःखाचा उमाळा आंवरून हुकूम केला कीं, एक क्षणाचा विलंब न करितां स्वारी निघण्याची तयारी करा. बरोबर दोन कोट रुपये खजीना घ्या. राहिलेले सरदार व मानकरी यांस वस्त्रें भूषणें द्या. जे कोणी प्रांतोप्रांतीं व्यवस्थेस असतील त्यांस बऱ्हाणपुरचे मुक्कामापर्यंत स्वारींत येऊन मिळण्यास लिहा.

**गो०ः**—[illegible]ग मी तर अगदीं वेळेवरच येऊन पोंचलों ह्मणायचा.

**बा०**—गादीचा अभिमान सर्वत्रांस आहेच. जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा हेही पत्र पोंचण्यापूर्वीच त्यांना ही हकीकत समजल्यावरून. सात हजार फौजेसह आह्मांस परवांच येऊन मिळाले. तसेंच सदाशिव रामचंद्र, विठ्ठल विश्राम व यमाजी शिवदेवही कालच येऊन दाखल झाले. सर्व फौज पाऊण लाखपर्यंत जमली आहे.

गो०—तर मग, येथून आतां लवकरच कूच व्हायचा असेल ?

बा०—येथेंच कांहीं दिवस मुक्काम करण्याचा बेत ठरून परवां पानपताकडे पत्र पाठविलें कीं, "आह्मी कोणत्या रस्त्यानें यावें ? दुराणीची छावणी कोठें आहे ? आपलें सैन्य कसें राहिलें आहे ? आह्मी दिल्लीकडून आल्यास दुराणी मध्यें आहे असें ऐकतों तेव्हां तुह्मी तिकडून आणि आह्मी इकडून येऊन दुराणीला मध्येंच जेरीस आणतां येईल कीं नाहीं ? कां आह्मी माळव्यांत राहूनच तुह्मांला धान्याची व सैन्याची पुरवणी करावी ? कां कुंभेरीपर्यंत येऊन तेथून जवळचे जवळ साह्य करावें ? हें होळकर व शिंदे ह्यांचा सल्ला घेऊन लवकर कळवावें. ह्मणजे तुमच्या पत्राप्रमाणें आह्मी सर्व तयारी ठेवून त्या नीच मात्रागमनी नजिबखानाला, होळकराजवळ मी तुमचा धर्मपुत्र आहे असें सांगून अखेर विश्वासघात केल्याबद्दल, व सुजाउद्दवला यानें आमचा अधिकार झुगारून टाकल्याबद्दल आणि त्या दुष्ट कुतुबशहास पेशव्यांचे भय वाटेनासें होऊन, त्यानें घायाळ दत्ताजी शिंद्याला लाथ मारून त्याचा छळ केल्याबद्दल, प्रायःश्चित्त देऊं. तरच खरे ब्राह्मण आणि मराठी—राज्याचे अभिमानी !" असें भाऊसाहेबास वीरश्री उत्पन्न करणारें पत्र रवाना केलें; आणि त्याचें उत्तर येईपर्यंत येथेंच रहावयाचें होतें. पण,—

गो०—( घाबरल्यासारखे करून ) पण म्हणजे ?

बा०—नानासाहेबांना रात्रीं दुष्ट स्वप्न पडलें. चार घटका दिवस असतांच एकदम घनघोर काळोख पडला, मोठमोठे उल्कापात झाले उलुक पक्षी दिवसा शब्द करूं लागले, आकाशांत जिकडे तिकडे धूमकेतु दिसूं लागले, चंद्रसूर्यास खग्रास ग्रहणें लागलीं, भयंकर धरणीकंप होऊं लागले आणि पृथ्वीनें सर्वत्रांस एकदमच गिळण्यास विक्राळ आ पसरला. नानासाहेब हें पहातांच भिऊन त्यांनें ओरडले व बेशुद्ध झाले. मग आह्मी तेथें गेल्यावर कांहा शांत उपचार केले. तेव्हां ते थोड्या वेळानें सावध झाले आणि त्यांनीं तें स्वप्न आम्हांस सांगितलें. नानासाहेबांस हें स्वप्न घातक आहे असें वाटूं लागले व त्यांनीं लागलीच जोतिषी बोलावून आणवून त्याला स्वप्न

सांगितलें. त्यानेंही तें अनिष्टकारक आहे असेंच सांगितलें. नानासाहेबांनीं हें ऐकतांच ते एकदम उदासीन झाले, आणि ही बातमी सर्व छावणींत पसरून जिकडे तिकडे एकच गोंधळ उडाला. नानासाहेबांना तर आतां येथें मुळींच दम निघत नाहीं. आतां पत्राची वाट न पाहतां पानपताकडे जायचें असें ते म्हणत आहेत. त्यांना भाऊसाहेब व रावसाहेब ह्यांना कधीं भेटेन असें झालें आहे. ते आज जे एका जागेवर बसले आहेत, तेथून हलले सुद्धां नाहींत.

गो०—नानासाहेबांसारख्या विचारी पुरुषानें स्वप्नांतील गोष्टींवरून इतका परिणाम आणला ह्मणता ?

बा०—मनुष्य एकदां विकाराधीन झाला म्हणजे विचाराचें कांहींच चालत नाहीं. नाहींतर नानासाहेबांना कां स्वप्न म्हणजे काय, हें माहीत नाहीं.

गो०—दैवगती विचित्र आहे. अर्जुनासारख्या योद्ध्याला व विचारी नरालाही कौरवांबरोबर युद्ध करण्यापूर्वी असाच मोह होऊन मायेच्या योगानें विचाराचें सामर्थ्य राहिलें नव्हतें.

( इतक्यांत तोफेचा आवाज ऐकूं येतो. )

बा०—दोन प्रहर झाले. चला आतां, लवकर जेवण आटोपून नानासाहेबांकडे गेलें पाहिजे; म्हणजे येथून केव्हां पानपताकडे निघावयाचें तें समजेल. तुम्हीही लौकरच तिकडे या.

गो०—मला सांगायला नको हें. आलोंच पहा मी लवकर.

( असें म्हणून दोघे निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळः—छावणींतील नानासाहेबांचा खाजगी तंबू.

( गोपिकाबाई बसलेली आहे असा प्रवेश होतो. )

गोपिकाबाईः—स्वारीनां तिकडे तसं स्वप्न पडलं आणि मला तें इथं असंच झालं. मेली कोणशी चांडाळीण आलीनि तिनं माझी भरले

ओटीच माझ्या अंगाला झोंबून सांडली. काय असेल तें असो ? भावोजी विश्वासरावाला नेतच नव्हते, पण मी आणि स्वारीनींच आग्रहानें न्या म्हटलं. तो तर अगोदरच एक पायावर जायाला तयार होता. त्याचं का मोहिमेवर जाण्याचं वय आहे ? कां लढाया पाहिल्या आहेत ? पण कोण हट्टी. म्हणाला मी जाणारच लढाईला. आपण गेला आणि मला लाविली आहे इकडे तळमळायला. बरं जातांना भाऊजीना सांगितलंच आहे कीं रायाला सांभाळून आणा म्हणून, पण काय करतील तें खरें. आई जगदंबे, माझ्या बाळाला सुरक्षित आणून मला भेटव बरं, ह्मणजे मी तुझी शतचंडी करवीन. (दचकल्या सारखें करून ) पण बाई, माझा उजवा डोळा कां असा एकदम लवूं लागला. काय बरं असेल ? सगळंच मेलं कसं दुष्ट व्हायला लागलं ? बायकांचा उजवा डोळा लवणं ह्मणजे कांहीं तरी वाईटच नव्हे कां ? आई अंबे, नकोग आह्मांवर असा प्रसंग आणूं. ( डोळ्यास पाणी आणते ) आमच्याकडून कांहीं चुक झाली असेल तर आह्मी नाक घासायला तयार आहोंत. ( पुन्हा डोळा लवल्यामुळें दचकून ) हाय हाय ! खचित कांहीं तरी वाईट घडून आलं वाटतं. मी जों जों मातोश्रीची प्रार्थना करितें तों तों अधिक अधिक डोळा कां लवूं लागला बरं. जगदंबा तरी आमच्या कर्मापुढें काय करणार आहे ? ( नारायणराव प्रवेश करितो. )

**नारायणराव**:—आई, आई; कांग रडतेस ?

**गो०**:—कांहीं नाहीं बाळ. जा, जा तूं खेळायला बाहेर.

**नारा०**:—मला नाहीं कां सांगत, कां रडतेस तें. मी नाहीं जात जा, अं अं !

**गो०**:—तुला पोराला काय सांगायचं ? खेळायला जायला सांगितलं म्हणजे जावं झालं.

**नारा०**:—आई मी पोर कसाग ? नाना नव्हते कां एकदां सांगत कीं " शकुंतलेच्या मुलानं सिंह आणि वाघ सुद्धां धरून आणावेत " तेव्हां मी म्हटलं " कां हो नाना, शकुंतलेचा मुलगा माझ्या एवढचा होता कां ? " तेव्हां ते म्हणाले " अरे त्याला मूल कोणी म्हणावें " ?

गो०:—मग कोण म्हणणार त्याला मूल? तो तसाच होता.

नारा०:—मी नाहीं कां तसा? परवां दादानन् मी शिकारीला जाऊन नाहीं कां वाघ मारून आणला.

गो०—भारी तूंच मारून आणला. वाघ मारला दादानं आणि याची केवढी बडेजाव. काय ह्मणें, परवां आम्हीं नाहीं कां वाघ मारून आणला.

नारा०—मी नाहीं कां, मी नाहीं कां मारला. आपण पुण्यास होतो, आन् काकांनीं आपल्या वाड्याच्या चौकांतल्या वाघावर पिस्तुल सोडायाला सांगितलान्, मी तो सोडला. मग त्या वाघाला लागली गोळी; तेव्हां काकां, थोरले काका व नाना, ह्यांना आनंद होऊन, मला नाहीं कां ह्मणाले; कीं शाबास! शाबास! चांगला वाघ मारलास तूं.

गो०—हा वेड्या, तो खरा वाघ कां होता? अरे तें चित्र!

नारा०—मग आण तर खरा वाघ. मी मारून दाखवितों तुला.

गो०—आह्मी बायकांनीं वाघ आणावा, आणि मग तो तूं मारणार!

नारा०—बरं मी आतां जाऊन वाघ मारून आणतों. पण, मला सांग बरं मघा कां रडत होतीस तें.

गो०—(आपल्याशींच) पहा कसा गुलाम आहे तो. पुन्हां त्यानं आपलं पहिल्या पदावर आणलंच. बर सांगावच याला आतां. (उघड) बरं मी सांगितलं, तर काय करणारेरे तूं?

नारा०—पण, तूं सांग तर खरं अगोदर.

गो०—सांगूचका; अरे, आपले काकान् दादा नाहीं कां गेले लढाईला, त्यांच्याकडची बातमी कळत नाहीं, ह्मणून वाईट वाटतं झालं.

नारा०—एवढेंच. मी पहा आतां बातमी आणतों ती.

गो०—केवढा पण बातमी आणणार. जसा हा मोठा पटाईत घोडेस्वार. घोड्यावर बसणारनी दवडत जाऊन बातमी आणणार.

नारा०—आई, घोड्यावरूनच कशाला जायला पाहिजे. काका नव्हते कां सांगत कीं, मारुती द्रोणागिरी आणित होता, त्याला भरतानं

बाण मारून खालीं पाडला. मग लक्ष्मणाला शक्ति लागली, ह्मणून मी लौकर द्रोणागिरी घेऊन जात होतो. असं मारुतीनं सांगितलं. मग भरतानं नाहींकां मारुतीला बाणावर बसविलं, आणि तेव्हांच रामाकडें पाठवून दिलं. मग, मी तसंच करणार. आपल्या मानाजी सांडणीस्वाराला बसवणार पिस्तुलावर, अन् सोडणार पिस्तुल. मग तो जाईल दादाकडें. अन् दादाला पत्रांत लिहीतो कीं तूं तसांच मानाजीला परत पाठव ह्मणून. मग नाहीं कां आतां बातमी कळणार. हा पहा मी मानाजीला घेऊन येतों. ( असें ह्मणून निघून जातो. )

गो०—अरे, इकडे ये इकडे. छे; गेलाच गुलाम. (थोडा वेळ थांबून) पण शर्थ आहे बाई याच्या स्मरणापुढें, अन् कल्पना पुढं. केव्हां गोष्ट सांगितलीन् केव्हां नाहीं. पण ती त्याच्या लक्षांत. वेडा कुठला. ह्मणे मी पिस्तुलावरून बातमी आणणार. आणि आतां काय मानाजीला आणायला गेलाय. बोललाय हाच त्याचा मानाजी अन् हीच त्याची बातमी आणणं. इथून गेल्यावर त्याला ह्यांच स्मरणही राहिलं नसेल. त्याला काय लढाईला गेलेलं आणि घरीं राहिलेलं ठाऊक. खायचं खेळायचं आणखी माणसांना रिझवायचं. हेंच त्याचं काम. आतांच पहाना, रायाबद्दल माझ्या मनांत येऊन मेलं कसंसच झालं होतं. पण, गुलामानं होता तो वेळ तिकडचं सगळ मन आपल्याकडे ओढून घेतलं ईश्वरानं हा मायामोह काय लावला आहे कुणाला ठाऊक. प्रथम तो आला तेव्हां मला असं झालं कीं, हा कशाला आला बरं पुढं जसजसा बोलूं लागला; तसतसं मन तिकडं वेधूं लागलं आणि शेवटीं शेवटीं तर रायाचा विसर पडून, हा येथून जाऊंच नये असं झालं. हाका मारते, पण कुठला थांबायला. गेला झालं. खरंच निपुत्रीकाचं तोंड पाहूं नये ह्मणतात, तें कांहीं वावग नाहीं. तो अभागीच. त्याला असल्या प्रत्यक्ष पुत्रप्रेमाचें सुख व अनुभव मिळत असेल, तर स्वप्नातच. ( नाना साहेब प्रवेश करितात. पण तें गोपिकाबाई समजत नाहीं )

नाना०—( आपल्याशींच ) मी आल्याचें हिला समजलेंहि नाहीं. कोणत्या विचारांत मग्न झाली आहे कोण जाणें? बरें आतां आपण पुढें न जातां एथेंच ऐकत राहावें.

गो०—पण, मेलं स्वप्नाचें नांव निघालं कीं, सगळी आठवण होऊन रायाचं कसं असेल, काय असेल, असंच व्हायाला लागतं. दुराणी मेले कडवे ह्मणतात, माझं बाळ जर त्यांच्या दृष्टी पडलं, तर ते त्याचं काय करतील नी काय नाहीं, कोण जाणें? पण नाहींच; त्याचं तें वय आणि रूप पाहून, त्या निर्दयांनाहि दया येईलच.

नाना०—(पुढें होऊन) निर्दयांना कशाला दया यायला पाहिजे. विश्वास कांहीं कमी समजूं नकोस. (गोपिकाबाई उभी रहाते) त्या नीच आणि लोभी यवनांना तो त्राही त्राही करून सोडील. त्यानें आमच्या वडिलांची कीर्ति ऐकलीच आहे. आणि तोहि ह्मणत असतोच कीं, मी आजोबांप्रमाणें या शिखानष्टांना 'दे माय धरणी ठाय करीन. (गोपिकाबाईस उद्देशून) मी ह्मटलें कीं, काय चालला आहे हा एकांत विचार.

गो०—विचार कसला करायचा, पण तसं होतं झालं आपली दुष्ट स्वप्नं—

नाना०—स्वप्नं! आणि त्याचें काय! मला प्रथम मात्र त्यापासून गोंधळल्या सारखें झालें; पण अमळ विचार केल्यावर असें वाटूं लागलें कीं, अंगी उत्साह असणें हीच विजयश्रींची लक्षणें आहेत. आणि आपलाच उत्साह नाहींसा झाल्यावर इतर सरदार व सेना यांकडे तर पाहावयालाच नको. समरांगणांत सेनानायक पडला ह्मणजे मग इतर सेना तेव्हांच उधळून जाते; तशीच स्थिती ह्या प्रसंगीही व्हावयाची. आतां येथून कुच करून पानपतचा रस्ता धरावयाचा असें माझ्या मनांत आलें आहे. पत्राची वाट पहात कुचंबत राहणें बरें नाहीं. वेळेवर मदत पोंचली तर त्या यवनांची बिशाद ती किती मारे जमीन दोस्त करूं.

गो०—पण आतां बसायचं नाहीं का खालीं.

नाना०—ठीक आहे. आमची कोठें ना आहे. (असें ह्मणून खालीं बसतात.

गो०—(नानासाहेबांजवळ बसून) पाठविलेला सांडणिस्वार आज उद्यां येईल नाहीं? तिकडची बातमी कळली असती, ह्मणजे तशी व्यवस्था करण्याला ठीक पडलं असतं.

ना०—एक दोन मुक्कामावर सांडणीस्वार भेटेल, मग पाहूं पुढचा विचार. पण अगोदर एक दोन मजलांची खोटी कां करावी.

गो०—निघायचं करावं, पण पुढची व्यवस्था आधींच लावावी हें बरं. नाहींतर, पुढं जावं आणि मग सांडणीस्वाराबरोबर निकडीचं पत्र आलंच तर, शांत पणानं विचार करून व्यवस्थाही करितां येऊ नये म्हणून म्हणते. ऐकायचं होईल तर सांगतें.

ना०—सांगा सांगा, नाहीं कोण म्हणेल ऐकायला.

गो०—आपण स्वतः कांहीं त्यांच्यांत मिळूं नये, तसचं विश्वासरायाला पत्र पाठवून आलीकडं बोलावून घ्यावं; आणि तेथेंच जवळपास राहून भाऊजी, शिंदे, होळकर व पवार ह्यांना धैर्य देत असावं.

ना०—तें सगळें बरोबर आहे, पण विश्वासाला आलीकडे बोलावून घेणें मात्र बरोबर दिसत नाहीं. अगोदरच जिकडे तिकडे झालें आहे कीं, सख्याभावाला लढाईला न लावतां, चुलतभावाला लढाईला लावलें म्हणून. मी तरी भाऊला कधीं जा म्हटलं. पण तेच पेटले हट्टाला. असो, आतां जर आपण विश्वासाला अलीकडे आणविलें, तर मग लोक काय म्हणतील? व स्वतः भाऊसाहेबाला तरी काय वाटेल? मला वाटतें असें कांहीं करूं नये. लमाणवाल्यांची व्यवस्था करून धान्याची कमताई पडूं नये इतकें झाल्यावर आपणच त्यांना जाऊन मिळावें आणि पाहावा त्या नजीब खान दुतोंड्याचा समाचार, सापासारखा उलटला काय!

गो०—गेल्याना खान् खोटं, कशाशी खावं, हें माहित असेल तरना? इतक्यांत म्हणायचं धर्म पुत्र, आन् घटकेन धरायची मानेवर तलवार. पण असंच आहे कीं, या कलींत खऱ्याची दुनीया नाहीं.

ना०:—काय? खऱ्याची दुनीया नाहीं? असें तर होणेंच नाहीं. त्या जगंन्नियंत्याला खोटें कधींही सहन होणार नाहीं. आपल्याला दुराचरणानें वर्तन करणाराचें प्रथम अशा रीतीनें बरें झालेलें पाहून असें वाटतें खरें. पण अंतीं झालेली दशा जर पाहायाला मिळाली, तर आपोआपच पहिलें खोटें वाटेल. ईश्वर दुष्टांचें जें चांगलें करितो; तें

एवढ्याच करितां कीं, त्यांनीं संपत्तिच्या मदानें दुराचरणें करावीं, व शेवटीं पापसंचय फार झाला ह्मणजे मग त्यांचा निःपात करावा. तूं पुराणांत ऐकलं असशीलच कीं, कौरव चांगल्या आचरणाचे नसतांही राज्यलक्ष्मीचा उपभोग घेत होते, तसेंच शुशुपाल प्रत्यक्ष श्रीकृष्णाचें अपराध करित असतां, सर्व सत्ताधिश तोच होता. पण जेव्हां ब्राह्मणाचा छल, परमात्म्याची निंदा, अशीं अनेक पापें एकवटून आलीं; तेव्हां कौरवांचा क्षय झाला आणि शशुपालहि मारला गेला. मग याच शिखानष्टांनीं पातकानें धन सुख घेतलें तर काय अधीक? त्यांना ह्मणावें, करा आणखी विश्वासघात! मिळवा संपत्ती! भोगा सुख! पण ह्याचा परिणाम तुह्माला शेवटीं भोगलाच पाहिजे.

(नारायणराव प्रवेश करून)

**नारा०**—नाना, नाना, पानपताहून होळकरकाकांकडून स्वार थैली घेऊन आला आहे, आणि पंत तुह्माला बोलाबित आहेत. तो आपला चोपदार बाहेर उभा आहे.

**ना०**—बरें आहे, मी जातों; थैलींत काय आलें आहे तें पाहतों.

(नानासाहेब जातात.)

**नारा०**—आई, आई; आणली कीं नाहीं बातमी.

**गो०**—हा लबाडा, मघा ह्मटलं "अरे इकडे ये इकडे." तर तसांच गेलास नाहीका? आतां नको मजजवळ येऊं जा.

**नारा०**—नाहींतर नाहीं. मी आपला नानाकडे जाईन जा

(असें ह्मणून जाऊं लागतो.)

**गो०**—अरे, पण हें पाहिलसं कां, काय आहे तें? मी तुला नाहीं हो देणार, माधवाला देईन हें.

**नारा०**—मला नको जा. आह्माला देतील नाना. (असें ह्मणून जातो.)

**गो०**—नाहीं ऐकत कां? एवढासा जीव पण कोण ताठा. देवा, तूं एवढ्याशा वयापासून असं वळण देतोसना. तरीच मोठेपणीं जुन्या झाडासारखं एक एक विकाराचं मुळ बळकट होतं बरं. (थोडे थांबून) पण स्वारी गेली आहे होळकरांची थैली वाचायला.

काय आहेन् काय नाहीं. जय गणपतीराया, चांगलं निघूंदे तींत ह्मणजे तुझे एकशे एकत्रीस ब्राह्मण घालीन. आनं मी आपल्या माधवाला तुझा भक्त करीन.

( पडदा पडतो. )

## प्रवेश ३ रा.

स्थळः—छावणी पलीकडील मैदान.

( मल्हारराव होळकर एकटाच उभा आहे. )

म०—पाठविलेली थैली तर पावलीच असेल, पण राहिलेली बातमी ह्या तोंडानें सांगण्याचा प्रसंग यावाना? आजपर्यंत कधीं अपजय! किंवा हाल! छे, मुळीच नाहीं. आणि आज तेंच सांगायचनां? या पेक्षां मेलो असतो तर बेहत्तर! पण हें मरणाहून मरण झालें आहें! आमचा गर्व ईश्वराला सहन झाला नाहीं. ह्मणून त्यानंच ही गोष्ट मुद्दाम घडवून आणली. रावणाशीं युद्ध करून हनुमंताला गर्व झाला होता तेव्हां तो लहुकुशांकडून हरण केला; माझा गर्व हरण करणेंच होता, तर तो तसाच विश्वासराव, माधवराव यांजकडून करायचा होता; त्याचा मला मुळींच खेद वाटला नसतां. पण तो या कृतघ्न आणि अधर्मी राक्षसांकडून! आणि धन्याचा सर्व तो परी नाश होऊन! धिःकार!! धिःकार!!! याहून जन्माला आलो नसतों तर फार चांगलं झालं असतं भाऊसाहेब, मला कशालाहो शेवटची निरवा निरव सांगितलींत, नाहींतर हा मल्हारी आपल्या बरोबर इंद्र लोकींच सुख घ्यायाला आला असतां. पण आतां काय उपयोग? माझं पूर्व सुकृतच कमी, नाहींतर तीन लाख सैन्य समर भुमीवर शयन पाऊन क्षात्र धर्मानं पावन झालं, आणि हा अभागी राहावा! भाऊसाहेब, आपली भेट केव्हां घेईन असं झालं आहे. भाऊसाहेब, आपला धनीपणा विसरून मी रागाच्या आवेशांत कांहीं कमज्यास्त बोललों, ह्मणूनच तुह्मीं मला सोडून गेलांत काय? आपल्याला स्वर्गाची पायरी चढतांना माझ्या भाषणाचा खेद वाटला असेल नाहीं? आणि स्वर्ग लोकीं जाऊन तुह्मी त्याची

विचक्षणाही करित असाल नाहीं? मीं आपळं शांतवन करायाला आतां कोणत्या मार्गानें येऊं? जनकोजीनें मात्र आपली स्वामीभक्ती पूर्ण दाखविली. भाऊसाहेब आपण त्याला आपल्या उजवें हाताकडे बसविलें असेल, आणि मलाच काहीं ढकलून दिलेत. हाय! हाय! असला तारा भी आपल्या डोळ्यादेखत घालविलानां? आतां मी नानासाहेबांना हें अपजयानं काळं ठिक्कर झालेलं तोंड कसं दाखऊं? भाऊसाहेब व रावसाहेब कुठे आहेत ह्मणून विचारल्यास काय सांगूं? हो, हो; हेंच सांगेन. विश्वासरायाला मी आपल्या हातानं गिलच्यांच्या तोफखान्यापुढं ढकललं असंच ह्मणेन. ह्मणजे नानासाहेबांना क्रोध येऊन मला तसाच तोफेच्या तोंडी देतील. पण तसें कुठलें व्हायाला. अगोदरच सर्व कच्च्या मजकुराची थैली रवाना केली आहे. (थोडे थांबून) आतां भाऊसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें पार्वतीबाईना नानासाहेबांच्या स्वाधीन करावी आणि घन्याच्या आज्ञेतून मुक्त व्हावें व शेवटीं भाऊसाहेबांना भेटण्या करितां देह त्याग करावा! पण छे, आत्महत्या केल्यानें रौरव नरकांत पचत पडावें लागेल, तर आंगाला राख फासून गोसावी बनावें आणि घोर अरण्यांत जाऊन ईश्वराचं ध्यान करावं, ह्मणजे इंद्रलोकीं जाणं होईल. झाला, झाला हाच निश्चय! पण हो, मुक्ति मिळण्याला त्रासानें देहाला कंटाळलेला माणूस योग्य नाहीं, तर खऱ्या विवेकानंच कंटाळला पाहिजे. विवेकानं देहाला कंटाळल्यावर मग जोगी तरीं कशाला व्हायाला पाहिजे आणि एकांत तरी काय करायचाय. (थांबून) बरी आठवण झाली. एकदां भाऊसाहेब सांगत होतें कीं, श्रीकृष्णानें अर्जुनाला भगवद्गीतेंत असें सांगितलें आहे कीं "करता करविता मी आहें. तुला मी कौरवांच्या क्षयाला पुढें कारण केलें आहे. तूं जरी ह्यांना मारिलें नाहींस, तरी तें मेल्यावांचून राहणार नाहींत. ह्मणून तूं सर्व कर्में कर. पण कर्म करतां मी आहे असें ह्मणूं नको. तसेंच झालेला हर्ष-शोक, सुख-दुःख, जयापजय, समान मान. ह्मणजे तूं मुक्त होशील." तेव्हां आपणही तसंच करावं. (बराचवेळ थांबून) बरं पण विंचूरकर अंद्याप आले नाहींत ते. मी त्यांना सांगितलें कीं, दर-

धारांतील कारभाऱ्यांना घेऊन या ह्मणून; ह्मणजे प्रत्यक्ष हें तोंड नाना साहेबांना दाखवायाला नको. (इतक्यांत बोलण्याचा आवाज ऐकूं येतो.) हें कोण आलें बरें. (निरखून पाहून) विंचूरकरच आणि दुसरें दिसतात ते कोण? (चांगलें निरखून पाहून) हो, ते बारामती-करच. (विंचूरकर व बारामतीकर बोलत येतात. मल्हारराव स्तब्ध उभा राहतो.)

विंचूरकर–एकून नानासाहेब मोठ्या विचारांत आहेत ह्मणतां?

बाबुजी॰-ते प्रथम तर अगदींच गोंधळून गेले, पण सगळी थैली वाचून विचाराला कारण झालें. मी थैली वाचूं लागलों, त्यांत "कुतुबशाहा व सैमतखान कतलबाज ह्यांची पंधरा हजार फौजेनिशीं कत्तल केली व कुंजपुरा सर केला' असें ऐकून नानासाहेबांना फार आनंद झाला व ह्मणाले. "शाबास सुभेदार, दत्ताजी शिंद्याबद्दल चांगला सूड घेतलात" 'पेशाच्या टंचाई मुळें भाऊ साहेबांनीं दिल्लीचें तक्त फोडून रुपये पाडिले; सुरजमल जाठ सोडून गेला,' हें ऐकून त्यांची मुद्रा आश्चर्यचकित झाली. 'गिलच्यांच्या बातमीवर पाठविलेल्या बारा-हजार स्वारांची भगवंतराव कदमासह डोकी कापून नेली.' हें ऐकून त्यांचें मन थोडेंसें कचरलें. 'गोविंदपंत बुंदेले खजीना घेऊन येत असतां, शत्रुकडून खजीना लुटला जाऊन बुंदेले मारले गेले. स्वामी-कार्या करितां अन्नावाचून लोक उपाशी मरत आहेत.' हें ऐकून त्यांना अतिशय वाईट वाटलें व ह्मणाले "ह्या नानाकरितां तुह्मी उपाशी मरत आहाना?" 'बळवंतराव मेंहदळे कामास आले. व त्यांची बायको लक्ष्मीबाई आपलं मूल भाऊंच्या ओटींत घालून सती गेली.' हें ऐकून त्यांना अतिशय त्वेष आला. आणि म्हणाले "पेशव्यांचा मेहेंदळे मारिलात काय? बरे आहे पाहून घेईन ह्मणावें. वाहवारे लक्ष्मी बाई! धन्य! धन्य आहे तुझी!! आपलें पातिव्रत्य पूर्ण केलेंस खरें." 'संताजीवाघ, तुकोजी शिंदे, व यशवंतराव पवार धारातीर्थी पावन झाले.' हें ऐकून त्यांच्या अंतःकरणांत कालवा कालव होऊन, त्यांची मुद्रा रखाल्या उद्विग्नतेनें व त्वेषाच्या उग्रतेनें, अभिमन्यूचा वध व जयद्-

थाचा सूड घेणाऱ्या अर्जूनाप्रमाणें दिसूं लागली. मी पुढें वाचूं लागलों. ' भाऊसाहेब व रावसाहेब यांनीं लढाईची शर्थ केली गिलच्या रणांगणांतून पळाला, त्याची चांगलीच खोड मोडली. ' हें ऐकून त्यांना धन्यता वाटली. व ह्मणाले " शाबास वीरहो, आर्यभूमीचें नांव राखिलेंत. " ' पण होऊं नये तें घडून आलें, ईश्वर कोपला, यास कोणाचा इलाज ? ' हें ऐकतांच त्यांचें तोंड खर्कन उतरलें— माझ्या डोळ्यांपुढें पुढील अक्षरें दिसली. माझ्या तोंडावाटे अक्षर निघेना. नानासाहेब ह्मणाले. " वाचा वाचा थांबलांत कां ? " मीं ह्मणालों ' काय वाचूं. ' ' रावसाहेबांस गोळी लागली. ' असें मी ह्मणत आहे, तोंच एकच हाहाःकार झाला. भाऊसाहेब हयपान घोड्यावर स्वार होऊन गर्दींत गेले, हें मला वाचायलाही झालें नाहीं. पुढें अर्ध घटकेनें थोडेंसें शांतवन झाल्यावर मी भाऊसाहेबांची हकीकत नाना-साहेबांस कळविली, व यावरच नानासाहेबांची पुढची उमेद आहे.

बा०—( मल्हारावाजवळ येऊन ) सुभेदार, असे खिन्न कां ?

म०—नाईक, काय सांगावं; आह्मी हें काळें तोंड घेऊन परत आलों आहोंत ना ?

बा०—काय ह्मणतां हें सुभेदार! एकूण मराठ्यांना अपजय! हर हर! काय हा प्रसंग!!

म०—अहो, प्रसंग काय सांगावा ! आम्हांला अशी वेळ कधींच आली नव्हती.

बा०—( विंचूरकराकडे पाहून ) विंचूरकर, तुम्ही आणि मी ह्या वेळपर्यंत बोलत बोलत आलों, पण तुह्मी ह्या संबंधानं अवाक्षर ही काढलं नाहींत.

वि०—काय सांगायचं नाईक ! ती अक्षरं तरी तोंडांतून बाहेर यायला पाहिजेतना ?

बा०—सुभेदार, सांगा सांगा, तिकडची सर्व हकीकत.

म०—आमची थैली तर पोंचली असेलच ?

बा०—थैली काल च तिसरे प्रहरीं मिळाली.

म०—रावसाहेबांस गोळी लागल्यानंतर भाऊसाहेब घोड्यावर बसून गर्दींत गेल्याचें कळविलेंच आहे. भाऊसाहेबांस आह्मी पुष्कळ सांगितलें पण त्यांनीं "बहिनींनीं विश्वास कोठें आहे ह्मणून विचारल्यास काय सांगूं? आतां हें काळें तोंड दाखविण्यास मी परत येणार नाहीं" असें सांगितलें आणि मला ह्मणाले कीं, सुभेदार, आपल्याला यश आलें नाहीं. ईश्वराची मर्जी! आतां तुम्ही आमच्या कुटुंबास सांभाळून पुण्यास न्या. पेशव्यांची बायको गिलच्यांकडे कैदी, असें म्हणवून घेऊं नका. प्रसंग पडल्यास तुम्ही आपल्या हातानें तिचे तुकडे तुकडे करा, पण आमच्या नांवाला आतां लागत आहे या पेक्षां अधीक काळोख लावून घेऊं नका."नाईक, काय सांगूं. भाऊसाहेबांचें हें भाषण ऐकून माझी स्थिती काय झाली ह्याची माझी मलाच आठवण नाहीं. कुंभेरीच्या वेळ्यांत प्रत्यक्ष माझा मुलगा खंडेराव गेला, पण त्याचंही मला इतकं वाईट वाटलं नाहीं; इतकेंच नाहीं, तर त्या वेळेस धैर्य धरून मी अशी प्रतिज्ञा केली कीं, 'कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन, तरच पेशव्यांचा बारगीर! पण ह्या वेळेस मी काय करावें? भाऊसाहेब गर्दींत जातांच आह्मीहि सर्व त्यांच्या पाठोपाठ गेलों, कोणी आपली तलवार मागें घेतली नाहीं. एकसारखे रक्तस्राव चालू होते. सर्वांच्या समशेरी तांबड्यालाल होऊन चकाकत होत्या. काय सांगूं शर्थ केली त्यावेळीं मराठ्यांनीं. पण दैव प्रतिकुळ. एक एक मोहरा सांडतच गेला. मराठे वीर रणांगणांतून माघार घेऊं लागले. त्यांचें धैर्य खचलें. सैन्य परत यावें ह्मणून आम्ही विजय झाल्याचें सैदोनही वाजविले, पण जे माघारी निघाले ते पुन्हा लढाईस तोंड देईनात. गिलच्यांनं एकसारखी कत्तल चालविली. समरांगणांत मराठे दिसेनांत. भाऊसाहेब ज्या गर्दींत शिरले, तिकडे तर दुराणीचा एवढा गराडा पडला होता कीं, त्यांतील मराठे कोण हेंही समजेना. नाईक, काय करूं, भाऊसाहेबांनीं ही आज्ञा केली नसती तर हा मल्हारीही हजार पांचशें गिलच्यांना हात दाखवून वीरांची गती घेता. पण आईचें स्मरण होतांच मला तसं करवेना. मी विसाजी कृष्ण जोगदंड

यांजबरोबर पांचशे धनगर देऊन बाईंच्या संरक्षणाला ठेविले होते तिकडे गेलों. त्या जागेवर जाऊन पाहिलें, तों तेथें एक माणुसहि नाहीं. जवळपास तपास केला, तेव्हां समजलें कीं, "अपल्या सैन्यांनीं पळ काढिला एवढें ऐकतांच जोगदंड जीव घेऊन पळाले".

बा० प्राणावर येऊन बेतली असतां, खरी स्वामीभक्ती दाखविणारे सेवक थोडेच असतात.

म०—बाई एकटीच, तिला कांहीं सुचेना. इकडे तिकडे धावूं लागली. शेवटीं दिल्लीच्या मार्गानें गेल्याचें समजलें. मग मीही तिकडे निघालों. मार्गांत नानापुरंदरे, आप्पाराव मेहेंदळे, कांहीं सरदार, पागेचे बारगीर आणि कांहीं शिलेदार असे शेंपन्नास असामी भेटले. आम्ही तिसरे मजलेवर मुक्कामास उतरलों, तों रात्रीं जानुभिताड्या बरोबर, बाई आमच्यांत येऊन मिळाल्या. त्यांना भाऊसाहेब दिल्लीकडे गेले असतील अशी मोठी आशा होती.

नाईक—बाईसाहेब तीन मजला कशा आल्या बरं?

म०—त्या रणांगणातून निघाल्या. त्यांच्या बरोबर जानू भिताड्याचा खिसमतगार धन्याच्या इमानाला जागून बाईस सोबत करीत होता. थोडेसें चालून गेले, इतक्यांत बारवेकर सरदार घोड्यावरून बसून चालला होता, त्याला बाईनें ह्मटलें कीं, मी भाऊसाहेबांची स्त्री आहे. मला दिल्लीपर्यंत घेऊन चला. हें ऐकून त्यानें धन्याच्या अन्नास स्मरून हिम्मत केली व बाईला आपल्या घोड्यावर बसविली. भोंवताली पाहिलें तों गिलच्यांचा गराडा. घोडा चांगला ज्वान होता. धैर्य धरून त्या यवनांच्या टोळींतून ते बाहेर पडले. खिजमतगारही मागे धांवत होताच. गिलचे त्यांचा पाठलाग करूं लागले, पण त्या दोघांच्या स्वामिभक्तीनेंच ते पार पडले. तों घोडा १०।१२ कोस पर्यंत टिकला; पुढें पिराजी राऊत भेटला त्यानें बाईस आपल्या घोड्यावर बसविली. तो घोडाही दमलेलाच; पांच सहा कोस चालला. मग जानुभिताड्यानें बाईसाहेबास कोस अर्ध कोस चालवित, कोठें घोडे भेटल्यास त्यावर बसवीत आह्मास येऊन गांठिलें.

नाई०—हर हर! कोण ही दशा!!

म०—आह्मी दिल्लींत न जातां, परस्पर इकडचा मार्ग धरिला. जे कोणी थकून चालण्यास असमर्थ झाले, ते दिल्लींत गेले. दिल्लीपासून तिसरे मुक्कामावर नारोशंकर पुरंधरे व इकडे येण्यास निघालेले सरदार आणि बुणगे वगैरे आह्मांस मिळाले. पुढची हकीकत विंचुरकरांना माहित आहेच, ते सांगतील; आतां मला कांहीं सुचत नाहीं.

नाई०—बरे राहुद्या ती हकीकत, पण भाऊसाहेबासंबंधीं अखेरची बातमी कायती सांगा.

म०—आह्मी दिल्लीपर्यंत आल्यावर मागे स्वार पाठवून बातमी काढली, परंतु कांहींच समजलें नाहीं.

ना०—युद्धांतून पळाले असतील तर गिलच्यांनीं धरून नेले असतील, नाहींतर उत्तम गती पावले असतील.

म०—भाऊसाहेब! आणि युद्धांतून पराङ्मुख!! कधींच होणार नाहींत.

ना०—बरे असो, आपण नानासाहेबांना हें वर्तमान कळवूं (मल्हाररावास) सुभेदार, बाईना नानासाहेबांच्या स्वाधीन करून आपली कामगिरी पूर्ण बजावा.

म०—नाईक, हा अभागी नानासाहेबांपुढें जायला नको, ह्मणून तर आपणाला बोलावून आणविलें. आतां आपणच करा माझ्याकरितां एवढं.

ना०—(विचार करून, आपल्याशीच) जर आपण हें ऐकिलें नाहीं तर बरें होणार नाहीं. आपण सुभेदारांची समजूत घालण्याकरितां नानासाहेबांकडूनच बोलावणें पाठवूं, आणि त्यांची समजूत घालूं. (उघड) बरें आहे. करितों मी ती तजवीज (बाबुजी नाईक जातात.)

म०—विंचुरकर, मी आपला पुढचा विचार तुह्मांला सांगणार होतों, पण माझं मन असें कांहीं चमत्कारिक झालें आहे कीं, कोणत्याच एका गोष्टीवर दृढ होत नाहीं. घटकेंत हें चांगलें, घटकेंत तें चांगलें, असें वाटतें; मिळून चांगलें कोणतें हेंच समजणें कठीण झालें आहे.

विंचु०—मनुष्याचें मन एकदां उद्विग्न झालें ह्मणजे मग त्याच्यां

विचारांचा निश्चय नाहींसा होतो. पण आपण कशासंबंधानें आणि काय करणार?

म०—आतां मी काय करणार तें चांगला विचार करूनच ठरवीन, आणि मग तुह्मांला कळवीन. बरे पण चला आतां आपल्या शिरावरचें एक मोठें ओझेंच खालीं उतरलें.

पडदा पडतो.

## प्रवेश ४

नानासाहेब, बाबुजीनाईक, मल्हारराव, व इतर सरदार बसले आहेत.

**नाना०**—सरदारहो, त्या परमेश्वराचा आह्मी असा काय अपराध केला होता, ह्मणून त्यानें आह्मांला असा दंड केला. विश्वासराया-सारखं पुत्रनिधान हिरावून नेलें, भाऊसाहेबांसारख्या बंधूचा ठिकाण नाहींसा केला, शत्रूंना प्रतिकृतांत भासणारी वीररत्नें आह्मांला सोडून गेली, देशकल्याणाकरितां आणि जात्याभिमानाकरितां तीन लक्ष हिंदु बळी पडले, राष्ट्रवैभव एकाएकीं लयाला जायला लागलें, मराठ्यांच्या नांवाला काळिमा आली, आमच्या या भरतभूमीचें नांव चाललें आणि शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रसाम्राज्याचा पाया स्थापून भारतीय-मंदीर उभारण्याची जी व्यवस्था केली, तिलाही भयंकर आघात बसण्याचा समय आला. आतां हीच स्थिती कायम राहील तर, आपणा मराठ्यांच्या गादीचा अभिमान बाळगणारांना केव्हांही वर मान काढितां येणार नाहीं. ( मल्हाररावांकडे पाहून ) सुभेदार एकूण भाऊसाहेबांचा पत्ता नाहीं. भाऊ, भाऊ; काय तुझी स्थिती झाली असल? अहमदशाअबदल्लीनें तुला कैदी ह्मणून नेला असेल आणि मी तें कानांनीं ऐकूं? ईश्वरा, अशीं अक्षरें ऐकायाला येऊ नयेत ह्मणून मला बधीरच करून टाक! पण तूं कैदी असतास तर तें समजायला राहिलं नसतं. मग तुझी गती तरी काय? कां रणांगणातून पळ काढून, मला तोंड दाखऊ नये ह्मणून गिरिगव्हरांत दडून बसलास? पण नाहीं, नाहीं, असले कुलाला कलंक लागणारे कृत्य तुझ्या हातून व्हावयाचें! कां तूं मजवर क्रोध धरून समरांगणांत सौख्यनिद्रा घेत-

लीस? असें असेल तर मला शेवटचा निरोप तरी पाठवायचा होतास. पण काय ह्या कल्पना! मला भ्रम झाला भ्रम! वेळ अवेळ न जाणतां काय मी वाहवयाला लागलों. (सर्वत्रांकडे पाहून) वीरहो, माझी स्थिती शुद्ध विचार रहित मनुष्याप्रमाणें झाली आहे. आतांच मनाला आकलन करून तुम्हांसी बोलूं लागलो, तों मध्यें तें सारे विसरून वेड्यासारखा बडबडूं लागलों.

बाबु०—वेड्यासारखे कसे. आमच्याही मनाची स्थिति अशीच झाली आहे. मग आपल्याला तर पुत्रवात्सल्यामुळें आणि बंधुप्रेमामुळें असें होणें साहजिक आहे. याला वेड कोण ह्मणणार.

नाना०—कल्पना हेंच वेड आणि दुसरें काय? कल्पनेचा पगडा विचार शक्तीवर बसू लागला कीं, वेड लागण्यास आरंभ झालाच. आतां इतकेंच कीं, तो पुरतेपणी बसलेला नसतो, तोंपर्यंत तें वेड लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. आणि तोच पुरतेपणी बसला ह्मणजे मग त्याला लोक वेड ह्मणूं लागतात (मल्हारावाकडे पाहून) सुभेदार हा असा प्रसंग आलाना?

म०—धन्याच्या सेवेला आह्मी आपली शिकस्त केली पण काय करणार!

नाना०—अन्नाची महर्गता, नाहीं तर आमचे मराठे बहादर कधींच हार जाते ना!

म०—अन्नावांचून तर जेरीस आले खरेच, तरीही त्यांनीं कमी केलें नाहीं. पण भाऊसाहेबांपुढें काय करणार! सुरजमल जाठ बादषाही तक्त फोडू नका, मी तुह्मांस धान्याची व खजीन्याची न्यूनता पडू देणार नाहीं; असें सांगत असतां भाऊसाहेबांनीं तें ऐकिलें नाहीं. इब्राहिमखानानें युद्धाचे वेळीं आपली सैन्य चक्राकार उभे केलें असतां आयत्या वेळीं ती व्यवस्था मोडण्यांत आली. अशी एक कीं दोन, पुष्कळ कारणें झालीं. आणि ह्यामुळेंच आजचा प्रसंग आला, नाहीं तर गिलच्यांना जन्मास आले कीं न आले, असें करून टाकिलें असतें.

नाना०—असो, कसेंही असो, पण आतां पुढें यत्न काय क-

राबा ? ( बाबुजी नाइकाकडे पाहून ) नाईक, भाऊसाहेबांच्या शोधार्थ कांहीं लोकांची रवानगी केलीना ?

नाई०—हो हो, तेव्हांच सांडणी स्वार व कांहीं सैन्य रवाना केलें.

नाना०—त्या यवनांनीं मात्रागमनीपणा करून वेळ निभावून नेली. तो जरठ चांगला अनुभवलेला, भाऊसाहेब व विश्वासराव मुलें, यांनीं काय पाहिलें होतें ? सुभेदार, तुमचें ऐकलेंच नाहीं ह्मणतां, मग तुह्मी तरी काय करणार ! पण सुभेदार, एकंदर गिलच्यांची कृति मनांत आली ह्मणजे काय करूं व काय नको करूं, असें होऊन जातें. अहमदशहा, माझा विश्वास या जगांतून नाहींसा केलास काय ? आणि निर्दयपणानें, सांपडलेल्या सर्व हिंदूंची कत्तल केलीस काय ? परमेश्वरा, हें तुला सहन तरी कसें झालें ! आह्मी आपल्या देशाचें संरक्षण करीत होतों, गिलच्याप्रमाणें पराभिलाष धरला नव्हता; असें असून तुला तो न्याय वाटला ना ! आणि ह्मणूनच तूं स्तब्ध राहिलास ना ! नाहींतर ह्या दुष्ट यवनांना भारती युद्धांतील वायवास्त्राप्रमाणें प्रखर झंझावात सोडून अंतरिक्षांत गिरक्या खायला लाविलें असतेस; अथवा एकेका नेभळ्या वीराच्या हातानें मोठमोठ्या तिस्मारखास मृत्युपथास लाविले असतेस ! पण तुझ्याच मनांत नव्हतें. आह्माला गर्व झाला होत, तो तूं हरण केलास. सरदारहो, परमेश्वरानें जरी आपल्या गर्वामुळें न्यायान्याय बाजूला ठेवून अपयश दिलें तरी आमच्या या भरतभूमीच्या अभिलाषबुद्धिबद्दल त्या शिखानष्टांनाही तो शासन करीलच. पण नाहीं, नुसतें शासन होऊन उपयोग नाहीं; तें आमच्याच हातानें झालें पाहिजे. वीरहो, सर्वजण धैर्य धरून उत्साहानें एकदां आपल्या समशेरीस हात घाला आणि आपल्या शिवाजी महाराजांचे स्मरण करून देशकल्याणाकरितां, स्वधर्माभिमानाकरितां आणि आपल्या देशाची कीर्ति रक्षण करण्याकरितां, पानपतच्या समरांगणांत जाऊन त्या बाहेर काढा; आणि घ्या एकदांचा सूड उगवून ! ( सर्वांकडे पाहून ) काय, असें खिन्नमुद्रेनें खालीं काय पाहतां ? शत्रूंनीं तुमचें इतके हाल केले तरी तुमच्या मनांत त्यांचे

पारिपत्य करण्याला अझून स्फुरण येत नाहीं ! मग आणखी तें काय करावयाचें राहिलें ? तुमच्या डोळ्यादेखत तुमच्या बायकांना ते आपल्या गोषांत खेचीत नाहींत, धगधगीत खड्ग तुमच्या मानेवर ठेऊन तुह्माला धर्मभ्रष्ट व्हा असें ह्मणत नाहीत, हेंच कीं नाहीं; आणि तेही तुह्मी आज त्यांचें पारिपत्य न केल्यास औरंगजेबाप्रमाणें लौकर पहावयास मिळेल. पण ज्यांच्यांतील स्वाभिमान नष्ट झालेला असतो, त्यांच्यापुढें असेंही घडलें तरी तें निमुटपणें सहन करतील ! ज्यांनीं हें सहन केलें ते खचित वीरपुरुष नव्हेत. जात्याभिमान आणि धर्माभिमान षंढालाही असतो, पण ज्यांना तो नाहीं ते खरोखर षंढाहून षंढ ! जर तुह्मी खऱ्या आर्यभूचे सेवक असाल, जर तुह्माला आपल्या कुलाचें नांव राखावयाचें असेल, जर आपला देशाभिमान जागृत ठेवावयाचा असेल, आणि शिवाजी महाराजांनीं स्थापिलेली मराठ्यांची गादी रक्षावयाची असेल, तर ह्मणा एकदां हरहर महादेव ! आणि करा स्वारीची तयारी ! गिलच्या गिलच्या ह्मणजे काय आहे, त्याला एकदांच अल्लाचें स्मरण करायला लावूं, आणि या सगळ्या दुष्ट कृतींचा सूड घेऊं.

**बाबु०**--ह्या वेळेस तो विजयाच्या आनंदभरांत मग्न असेल, तेव्हां आपण एकदम गेल्यास आपलें काम सहज घडेल ! ( थोडा वेळ गेल्यानंतर कोणी बोलत नाहीं असें पाहून )

**नाना०**--वीरहो, काय तुह्माला एवढा विचार पडला आहे ! यश अपयश येणें हें परमेश्वराधीन आहे. मग लढतां लढतां जें होईल तें खरें. पण आंगीं असला नेभळेपणा घेऊन आपल्या नांवाला काळिमा फासावी हें तुम्हाला कसें बरें योग्य दिसतें ? तुह्मी आज असा भेकडपणा पतकरिला ह्मणजे तुमचीं मुलें पुढें तुमचाच कित्ता गिरवूं लागतील ! आणि या भरतभूमीवरील वीरमाता नाहींतशा होतील. मरण हें प्रत्येकाचे मागें आहेच ! आणि तें केव्हांना केव्हां तरी येणारच ! युद्ध करून मेल्यास आपलीं नांवें अजरामर होतील पण अशा स्थितींत राहून, मेल्याहून मेलें असणें चांगलें काय ?

**मल्हा०**--आजपर्यंत धन्याच्या कामाकरितां मी माघार घेतली

नाहींच, आणि आतांही घेणार नाहीं. धन्याबरोबर या बारगिराचीं तयारी आहे. आतां आपण गेलों आणि आपली फत्ते झाली तर, मग आपलीं हीं सर्व दुःखें विसरून जाऊन जो आनंद होईल त्याला पारावारच उरणार नाहीं.

**इतर**—धन्याचा जसा हुकूम होईल त्याप्रमाणें आह्मी काम बजाविण्यास तयार आहोंत. दुराणींनीं ह्मणजे नेहमीं विजयप्राप्तीचा इंद्रजिताप्रमाणें याग केलेला आहे असें नाहीं. इंद्रजितालाही अपजयाचे वेळीं यागसिद्धी झाली नाहीं. मग हें तर काय अविंधच !

**नाना०**—शाबास माझ्या वीरहो. मातेच्या उदरीं जन्मून तिला धन्य केलेंत. तुमचा हा उत्साह पाहून तुमचे पूर्वज स्वर्गलोकीं आनंद पावतील. तशीच तुमची ही आर्यभूमाता दयार्द्रदृष्टीनें तुह्माकडे पाहूं लागेल आणि न्यायदेवता तुमचा खरा अभिमान पाहून सत्पक्षानें तुह्माला विजयश्रीची माळ घालण्यास तयार होईल. तर घ्या एकदां देवाचें नांव आणि करा युद्धाची तयारी ! वारंवार ह्या दुष्टांचा कृतघ्नपणा कोणी सहन करावा ?

**सर्व सर०**—धन्याच्या मागें आह्मीही निघालोंच. आजपर्यंत आपल्या अन्नावर हे देह वाढलेले आहेत, तर त्याचा आतां उपयोग करून कृतार्थ तरी होऊं.

**नाना०**—ह्मणा तर मग हरहर महादेव ! आणि लागा आपआपल्या तयारीला.

**सर्व०**—हरहर महादेव !

( पडदा पडतो. )

## प्रवेश ५.

छावणींतील खाजगी तंबू.

गोपिकाबाई एकटीच बसली आहे.

**गो०**—देवा तूं दयाळू नरे ? मग कां माझ्या कोमल बाळावर असी आग पाखडलीस ? युद्धाच्या वेळेस त्याला तिकडची आणि

माझी आठवण झाली असेल; आणि मी कशाला लढाईला आलों, असेंहि वाटलें असेल. नाहीं, वीरांना तसें वाटत नाहीं ह्मणतात; पण हा वीर कुठला ! छेः असंहि नाहीं, तो बाळ वीरच. ह्मणताततना, सिंहाच्या पोराला कुठं सिंहाच्या आंगचे गुण शिकवावे लागतात. ते उपजतच असतात. तसा माझा विश्वास वीराचा बच्चा आहे. मी ह्मणत होते कीं, आतां हा लढाईहून परत आल्यावर पुनः नाहीं लढाईला लावणार त्याला. पण आतां त्याचं काय उरलं, एकदां गेला तो गेला. शेवटची भेट भाऊजींच्या हातांत हात दिला तीचना ! आतां कुठला तो दिसायला. भाऊजी, मी तुह्माला विश्वासरायाला सांभाळून आणा ह्मणून ह्मटलंना ? मग कायहो झालं ? आपण तरी काय करणार देवाच्या नेमा पुढं. पण भाऊजी, आपण तरी परत यायचं होतं, आणि मला सांगायचं होतं कीं, विश्वासरायाला मी कोण सांभाळणार ह्मणून ? भाऊजी, मी विश्वासरायाला सांभाळण्यास सांगितलं ह्मणूनच आपण त्याच्या बरोबर त्याला सांभाळायला गेलांत काय हो ? असं असेल तर, नकाहो नका जाऊं ! परता कसे लवकर मागं ! अहा, काय मी वेडी ! आतां ते जे गेले, ते माझ्या ह्मणण्यानं कां परत येतील ? ( थोडा वेळ थांबून ) पण विश्वासा, तुला मरतांना काय रे वाटलें असेल ? जगांत येऊन तूं कोणतं सुख घेतलं होतंस, तर आनंदानं मेला असशील; तुझ्या वर्मी गोळी लागली असेल, तेव्हां काय वेदना झाल्या असतील ? आणि त्या राक्षसांनीं लांब लांब दाढ्या सावरीत तुझ्या भोंवतीं वेढा घातल्यावर तुला काय वाटलं असेल ? पण वर्मी गोळी लागल्यावर तेव्हांच आटोपतं; मग त्या यवनांच्या गराड्यानं काय व्हायचं आहे. गोळी चांगलीच वर्मी लागली असेल, नाहीं तर माझं बाळ कधींच धीर सोडतना. इथंच ह्मणत असे कीं, “ तलवारीचे वार आन् बंदुकीची गोळी वर्मी लागली नाहीं, तोंपर्यंत मी कोणाला हार जाणार नाहीं. लहान सहान घाय ह्मणजे विरांचीं पुष्पें आहेत.” पण त्याच्या या ह्मणण्याचा आतां काय उपयोग ? बाळा विश्वासा, त्या चांडाळांना नाहींना तुझी दया आली ? वैरी ह्मटला कीं, तो लहान असो, मोठा असो, त्याला कोण सोडतो ? कंसानें नाहीं देवकीची उपजत मुलंच शिळेवर आपटून मारिलीं.

बैऱ्यावर कोण दया करील ? मूर्ख असेल तो करील; नाहीं तर ज्यानं संसार सोडलाय तो करील ! सापाचं आणि वाघाचं पिलूं लहान असतं, पण जीव घ्यायला कमी करीत नसतं, हें कां त्या दुष्टांना कळत नसेल, तर ते त्याच्यावर दया करतील. उगीच माझे वेडे विचार झालं.

**नाना०**–( प्रवेश करून दुःखानें ) इकडून रवाना केलेल्या स्वारांना पानपताकडून परत येणारी सैन्याची टोळी भेटली तिनें भाऊसाहेबांचा इहलोकीचा वास संपविल्याचें कळविलें. आतां तो माझा भाऊ मी कोठें पाहूं. ( गोपिकाबाई नानासाहेबांचें हें भाषण ऐकून संचित होते. व नानसाहेबांकडे पहात उभी रहाते. ) भाऊ, भाऊ; सर्व राज्य गेले असतें तरी हरकत नव्हती. पण तूं माघारी यायचें होतेस. अगोरच चुलत भावाला लढाईवर पाठविला, असें लोक म्हणत असत; आतांतर लढाईवर पाठवून मारविला असेंही म्हणूं लागतील.

भाऊ, मी तुला लढाइला जावयास सांगितलें होतें काय? पण आतां त्याचें काय! कित्येक जनापवाद असे असतात कीं, ते सप्रमाण खोटे करून दाखविले तरी, लोक आपला पहिला ग्रह सोडित नाहींत. तेव्हां त्याचें समाधान आपल्या मनाशींच करून घेतलें पाहिजे. पण माझें नाहीं समाधान होणार! आतां हा राज्यकारभार मला जड वाटायला लागला. पण काय करूं! ( संतापानें ) नाहीं! नाहीं।! याचा सूड घेतलाच पाहिजे! सूड! सूड!। ( सूड सूड असें म्हणून नानासाहेब तेथेंच तलवारीचे हातवारे करूं लागतात ) गोपिकाबाई तें पाहून त्यांच्याजवळ जाते व बोलूं लागते.

**गो०**–पण असं काय करायचं तें. असा आपल्याच मनाचा संताप व शोक करून काय होणार आहे ? अमळ धीर धरला पाहिजे. घेता येईल सूड ! पण आपण असें कल्यानें शरीराला मात्र त्रास होणार आहे.

**नाना०**–बरं आहे, आतां आपण येथेंच रहावें किंवा पुण्याला

परत जाव. आह्मा आता गिलच्यांना पाहून घेतां. अरे, माझ्या प्रियपुत्र विश्वास मारिलात काय! आणि केवळ माझा जीवात्मा भाऊ, मज-पासून दूर केलात काय! कोण हें सहन करणार!! पण भाऊ, तूं मला कधीं भेटशील रे ?

गो०—हें काय बोलणं! एकदा गेलेलं कां पुन्हा कधीं भेटत असतं ? ( आपल्याशींच ) ह्यांचा हा क्रोध नाहींसा होईपर्यंत आतां यां-ना लढाईवरच जाऊं देऊं नये. ( उघड ) आतां किनाहीं आपण लढा-ईला मुळींच जाऊं नये. आपण सगळेच पुण्यास जाऊं; आणि तेथें रघुनाथ भावोजींचा विचार घेऊन, मग गिलच्यांचा सूड घेण्याची तजवीज करूं.

ना०—काय? भाऊ पुण्यास येईल?

गो०—( स्वगत ) बाई, हे असं काय करायला लागले. ( उघड ) ऐकलं का. मी रघुनाथभाऊजी तिथं भेटतील असं ह्मटलं. ते भाऊजी आतां कुठले दृष्टी पडायला. भाऊजी आपण गेलातनी हा काय प्रसंग आणलात? ( असें ह्मणून गोपिकाबाई रडूं लागते. )

ना०—काय! भाऊ नाहीं पुन्हः दृष्टीस पडणार! अहमदशहा, सावध रहा आतां स्वर्गाला जायला. ज्या पानपतच्या रणांत भाऊला नाहींसा केला त्याच ठिकाणीं धरून तुला स्वर्गलोकीं लावीन, आणि भाऊला परत आणवीन. भाऊ, भाऊ; तूं आल्यावर मला कडकडून भेटशील नारे? कां मी तुजबरोबर आलों नाहीं ह्मणून मजवर रागावशील?

गो०—( स्वगत ) आतां काय करावं. हे असं काय बोलतात? ( नाना साहेबांस हात लावून. ) हें पहा, आपण माझ्याशीं एकदां बोलतां कां? असं भलभलतं काय ह्मणतां आपण? मी सांगतें हें,तर ऐका. आपण अम्मळ शांत व्हा. अशा रागाच्या आवेशांत भल-तंच व्हायचं.

ना०—कांहीं नाहीं. अरे गिलच्यांनो फार उन्मत्त झालात नाहीं! आलों, 'आलों; तुमचा उन्मत्तपणा पहायला! माझा भाऊ लवकर आणून दिला तर बरं;' नाहीं तर हा नाना तुमचं काबूल, कंदाहार

सिंधूनदांत पालथं घालीन, तुमच्या अल्लाशीं टक्कर घेईन, पण मी आपला भाऊ परत आणवीन.

गो०—असं काय, आपण थोडसं मन आवरून धरा.

ना—बस्स, तुह्मी जावें तिकडे कृष्णा नदी उतरून. आतां आमची वाट निराळी.

गो०—( घाबरून ) कृष्णा नदी उतरून, असं काय ह्मणतात हे. मला वाटतं यांच्या बुद्धीला भ्रम झाला भ्रम. आतां काय बरं करूं. अग, कोणी आहे कां तिकडे ( गजी जी ह्मणून ओ देते. )

गो०—गजे, इकडे ये इकडे, ये लवकर.

( गजी प्रवेश करून )

ग०—ही आलें बाईसाहेब.

गो०—गजे, जा जा लवकर आणि बाबुजीनाईकांना घेऊन ये. इतक्यांतल्या इतक्यांत स्वारी कससंच करायला लागली आहे. ( गजी गडबडीनें जाते. )

गो०—जगदंबे, नकोग नको आणखी कांहीं संकट आणूस आह्मावर.

ना०—वाहवारे माझ्या वीरहो! वाजवा नौबद. चला, निघा.

( इतक्यांत बाबुजीनाईक व गजी येते. )

नाईक—( गर्दीनें पुढें होऊन ) काय, काय; झालें तरी काय?

गो०—काय, आपलं कर्म! स्वारी घटकेंत चांगलं बोलतेन्, घटकेंत कांहीं तरी बरळायला लागते.

नाईक—( नानासाहेबांजवळ जाऊन ) नानासाहेब आपण हें असं कायं करितां?

ना०—तयारी झाली, तर निघा लढाईला. पण दम धरा. अगोदर राघूला एक पत्र लिहा कीं, भाऊला सोडवायला पानपतास लवकर ये ह्मणून.

नाईक—मी तसं करितों. पण—

ना०---पण कशाला. त्यांना सांगा कीं, तुह्मी धीरानें मुक्काम करीत करीत या. आह्मी जातों आतां त्या अहमदशहाला—बास: भाऊ, घेणार तुझा सूड!

नाईक—(गोपिकाबाईकडे पाहून) श्रीमंतांच्या चित्ताला भ्रम झाला, हेंच खरें.

गो०—खरोखरच भ्रम झाला ह्मणतां काय? हायरे देवा! (बेशुद्ध होते.)

नाईक—(घाबरून) आतां काय बरं करावं? (गोपिकाबाई-जवळ जाऊन) बाईसाहेब, बाईसाहेब, सावध व्हा. आतां आपणही असं केल्यावर मग कसं होईल?

गो०—(सावध होऊन उठून बसून) काय हें देवानं आमच्यावर संकट आणलं आहे?

नाईक—संकट आलेलं आहे खरं, पण तें दूर होईल. मात्र तुह्मी धैर्य धरून शोक आवरा. (गजीकडे पाहून) गजे, जा आणि आपल्या त्या वैद्यबुवाना लवकर घेऊन ये बरं.

(गजी जाते.)

गो०—कसा आवरूं हो हा शोक? विश्वासराय गेला, आणि आ-तां हें असं. खरोखर मजसारखी पापीण दुसरी कोणी नसेल.

नाई०—पुत्रमोह कठीण आहे खरा. पण पतीवर संकट आलं असतां तें नाहींसं होण्याकरितां, सूज्ञ बायका उपाय योजितात. पुत्रा-चा शोक करीत नाहींत. ह्मणून आपण शोक आवरून पुढची व्यव-स्था करावी.

गो०—मला वाटतं आपण पुण्याकडे जावं.

नाई०—दुसरी तोडच नाहीं. (नानासाहेबांस) नानासाहेब, खासास्वारीनं अहमदशहावर जाणं योग्य नाहीं. आह्मी जाऊन त्या-चें पारिपत्य करितों. आपण पुण्याला जावें.

ना०—नाहीं, नाहीं. पुण्यास गेल्यावर माझा भाऊ मला भेट-णार नाहीं.

नाई०–( गोपिकाबाईस ) आतां ह्यांना विशेष दुराग्रहाला पेटवून उपयोग नाहीं. कसंहीकरून पुण्याकडे तर गेलेंच पाहिजे. ( सुचल्यासारखें करून ) हो मला एक युक्ति सुचली.

गो०–कोणती बरं?

नाई०–सर्व सरदारांना लढाईवर जाण्याची तयारी करायला सांगितलेलं आहे आणि उद्यां पाहाटेस सर्वांचा निघण्याचा विचार आहे. तेव्हां पानपताकडे न जातां पुण्याला चलावं आणि पानपताकडेच जातों असें नानासाहेबांना सांगावें. हल्लींच्या त्यांच्या स्थितीवरून आपण कोणीकडे जातों हें त्यांना समजणार नाहींच. ह्या वांचून दुसरी युक्तीही नाहीं आणि दुसऱ्या युक्तीनें जुळणारही नाहीं.

गो०—फारच चांगलं. असेंच करून आपण पुण्याला जाऊं. पण ह्यांची स्थिति चांगली होण्याला काय बरं करतां?

नाई०—आतां प्रथम कांहीं नको करायला. आपण पुण्याकडे जाऊं, तोंपर्यंत त्यांचा क्रोध व दुःख नाहींसं होईल. मग आपोआपच ते चांगले होतील. तसें आपले वैद्यबुवा आहेतच तब्येत पहायला.

( पडदा पडतो. )

अंक १ ला समाप्त.

---





# अंक २ रा.

---

## स्थळ–पानपत जवळील मैदानांतलि अहमदशहाची छावणी.

अहमदशहा, शहावलीखान, सुजाउद्दवला, नजीबखानरोहिला, बारदोरखान, काशीराज व कांहीं सरदार बसले आहेत असा प्रवेश होतो.

**अह०**—वीरहो, देवाच्या कृपेनें आपण आज विजयी झालों, तेव्हां आपल्या आनंदाला पारावारच उरला नाहीं. त्या मराठ्यांना फार गर्व झाला होता. आणि ते आपल्याला तृणप्राय मानीत, पण तें आज त्यांना चांगलेंच अनुभवाला आलें. आतां त्यांना वर मान करण्यास जागा उरली नाहीं. त्यांच्यांतील मोठे मोठे वीर म्हणजे शिंदे, होळकर, पवार, पण काय त्यांची दशा उडवून दिल्लीत ! धन्य आहे तुमची ! तुमच्यासारखें बलाढ्य योद्धे असल्यावर आह्माला केव्हांही काळजी वाहण्याचें कारण नाहीं. आम्ही केवळ नांवालाच पुढें आहोंत. हें वैभव वाढविणें किंवा कमी करणें सगळें तुमच्याकडेच आहे. मनुष्याला जें मोठेपण मिळत असतें तें त्याचें त्याला मिळवितां येत नाहीं. तें लोकांकडूनच मिळत असतें. कधीं कधीं तर चांगले गुणज्ञही त्यांना चहाते नसल्यानें मागें पडून राहतात, व कित्येक गुणज्ञ नसतांही त्यांना केवळ मोठे मानणारेच असल्यामुळें व्यर्थ वैभवास चढतात. यांतून कोणत्याही रीतीनें मला वैभवास चढविलेलें असो, त्याचा मला विचार करणें नाहीं. पण केव्हांही माझ्या हांतून तुमचें अकल्याण होण्याचा समय आला तर मला वेळींच सावध करीत असा. नाहींतर केव्हां केव्हां अधिकाराच्या किंवा आवेशाच्या भरांत वाईट गोष्ट घडून येते व ती पुनः चांगली करणें आपल्या स्वाधीन राहत नाहीं. असो, आजच्या एकंदर कृत्याचा विचार केला ह्मणजे आपल्याला विजयामुळें आनंद झाला आहे, तरीं त्यांत दुःख हें आहेच. प्रत्यक्ष माझे दोन पुत्र या रणसंग्रामांत मला सोडून गेले आणि पुत्रशोकासारखें दुसरें दुःख नाहीं. पण

तें दुःखही आज आपली फत्ते झाल्यानें कांहीं वेळ विसरून गेलों होतों. आतां त्यांचें स्मरण होतांच माझें मन तळमळूं लागलें.

**काशि०**–कलहांत उभय पक्षांचा नाश हा व्हावयाचाच. पण ज्याचा पक्ष सबळ ठरतो तो त्या नाशाची विशेष दिक्कत ठेवीत नाहीं. जरी असें आहे तरी पुत्रनाश मात्र त्यांतला नाहीं.

**अह०**—असो, त्याचा विचार करून उपयोग नाहीं. आज जें काम पतकरिलें आहे तें बजावण्यास तयार असलें पाहिजे. वीरहो, आजच्या या युद्धप्रसंगीं ज्यांनीं आपल्या जीवाकडे न पाहतां योग्य कामगिरी बजाविली; त्यांना बक्षिसें दिलीं पाहिजेत. जे कोणी इहलोक सोडून स्वर्गलोकीं गेले असतील, त्यांच्या बायका मुलांस इनामें करून दिलीं पाहिजेत. कोणी घायाळ असतील त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था लाविली पाहिजे. ह्मणून प्रथमतः ह्याचा योग्य तपास करा. तसेंच तुह्मी केलेले पराक्रमही मला समजले पाहिजेत. तुम्ही दत्ताजी शिंद्या-शीं लढला, तो पराक्रम कानानीं ऐकिला व आतां तर सर्व प्रत्यक्ष पहाणार होतों. पण मराठ्यांची हुल्लड फार मोठी ह्यामुळें पहाण्यास झालें नाहीं. तेव्हां आतां ऐकूनच संतोष मानून घेणार.

**सु०**–पहिल्या हकिकती तर माहीत आहेतच कीं, मी प्रथम शिंदे व होळकरांवर चाल करून गेलों; त्या सरसे ते माघारे पळू लागले. त्यावर विश्वासरावास गोळी लागली तेव्हां मी जिवाची आशा न धरितां मोठ्या निकरानें चाल केली. पण त्यावेळीं मराठे फार चेवले होते, तेव्हां मला माघार घ्यावी लागली. पण जेव्हां तो पेशवा घो-ड्यावर बसून मोठ्या आवेशानें रणमैदान घुमवूं लागला तेव्हां मलाही स्फुरण चढलें. आणि मी हाच निश्चय केला कीं, आज आपली बाजू तरी राखीन, नाहींतर आखेर तरी करून घेईन. असा नेम केल्यावर हलकेच शिंदे व होळकर कोणीकडे आहेत याची चौकशी केली व ते उजव्या बाजूस आहेतसें पाहून डाव्या बाजूनें चाल केली.

तिकडे पाहतो तो इब्राहिमखान गार्दी दोनशे तोफानिशीं झुंजत होता. त्याचा मार मोठा कठीण त्यानें एकसारखा तोफांचा भडीमार चालविला होता. त्यामुळें आपले लोकपुढें सरसावेनात. मग मी हिम्मत धरून हलकेच त्यांच्या रिसाल्यांत शिरून तलवार चालू केली. तेव्हां त्यांची एकच दाणादाण उडून गेली. जो तो तोफ सोडून पळूं लागला. आह्मी त्यांची कत्तल चालविली. तलवारी नुसत्या खणखणत होत्या. अशी केली कीं, ज्याचें ह्मणतात ते. इब्राहिमखान एकटाच जाग्यावर राहिला. मग त्यानें तोफ जागचे सोडून दिले व आपणास कोणाची मदत येत नाहीं तेव्हां आपले संपलेच आहे, अशा विकाराची त्याची मुखचर्या दिसूं लागली. तरी त्यानें हातांत तलवार घेऊन आह्मांवर चाल केली. ते पाहून आह्मी आश्चर्य चकित झालों कीं; एकटा उरला असतां काय हें ह्याचें विलक्षण धैर्य ! त्यानें आमच्या सैन्याची एकसारखी कत्तल करण्याचा सपाटा सुरू केला. मोठमोठ्या सरदारांनाही त्यानें आपली तलवार चांगलीच दाखविली. इतकें झालें तरी, आह्माला त्याच्यावर चाल करवेना. आम्हास वाटलें कीं, हा आपला जातभाई हा जर आपणाकडे मिळाला तर मग काय पाहिजे, मी त्यांस ह्मटलें " मराठ्यांनीं आपले जीव वाचविण्यास पळ काढला. आणि तुह्मास एकटे सोडून मरण आणलें. आतां तुम्ही तरी कां विनाकारण मरतां ? मी मागेंच आपणास पत्रें लिहिलीं होतीं कीं, तुम्ही. आम्ही एक असतांना तुमचें हें करणें योग्य नाहीं. अजूनही आह्मांस मिळा. नाहीं तर व्यर्थ व्यर्थ मराल " पण तो कसला इमानी ! धन्य आहे त्याच्या इमानाची ! त्यानें उत्तर दिलें कीं, " मी असा मरणाला भिणारा नाहीं. मरणाला भिणारा योद्धाच नव्हे. मी जे पेशव्यांना वचन दिलें आहे. तें प्रथम प्राण देऊन नंतर दिलें आहे. पेशव्यांचा प्रताप कानीं दुमदुमत आहे; तोंपर्यंत हा एकटा तुमच्याशीं लढेल ! फार काय, शीर कापलें तरी माझें धडही पेशव्यांच्या करितां वीराचें कर्म करील, " असा पेशव्यांचा थोरपणा गाइलेला ऐकून मला त्वेष आला व एकदम सर्वत्रास सांगितलें कीं, " कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ कशाला पाहिजे. " लावा त्याची वाट ! पण पुन्हः सांगितलें.

नाहीं, नाहीं; त्यास जिवंतच धरा. कैदी झाल्यावर कदाचित त्याला आपणास मिळावेंसें वाटेल. तेव्हां त्याला जिवंतच धरिला आहे.

अह०—अहारे इब्राहिमखान ! तुझा जात्याभिमान कसा नाहींसा झाला ! बास त्याला क्षणभरही जिवंत टेवू. नका आतांच्या आतां हालहाल करून ठार करा.

नजी०—आपल्या हुकुमाप्रमाणें करण्यास हा बंदा तयार आहे. पण तो आपला जातभाई.

अह०—नाहीं, जातभाई नाहीं आणि कोणी नाहीं. ज्यानें आपला जात्याभिमान आणि धर्माभिमान सोडिला असतो, त्यावर दया करणारा तसाच असला पाहिजे. त्याला हालहाल करून ठार मारला पाहिजे आणि तळमळत अधःपाताला जाईसें केले पाहिजे.

शहावाली०—जो आपला धर्म सोडितो त्याला अधःपाता वाचून दुसरी गतीच नाहीं.

काशी०—त्यानें जात्याभिमान सोडिला, यावरून धर्म सोडिला असें मात्र नाहीं होणार. त्यानें आपली सत्यनिष्ठा संरक्षण केली. देव त्याला सुगति देईल यांत कांहीं संशय नाहीं.

अह०—( रागानें ) काशीराज तुह्मी ब्राह्मण, ह्मणून पेशव्यांची बाजू धरून बोलतां काय ? आह्माला नाहीं हें पसंत पडणार !

काशी०—नाहीं, मी मराठ्यांच्या पक्षानें बोललों नाहीं. खरें दिसलें तें सांगितलें.

अहं०—एका पक्षास मन असलें ह्मणजे तोच पक्ष खरा वाटतो. तुमचें मन पेशव्यांसारखें आहे, तेव्हां तुह्माला तो पक्ष खरा वाटणारच.

काशी०—असें नाहीं. जोपर्यंत मी आपल्या पदरीं आहे, तोपर्यंत आपली कामगिरी योग्य रीतीनें बजावीन. त्यांत मी ब्राह्मण ह्मणून पक्षपात अथवा कसूर करणार नाहीं;

अहं०—बरं आहे, मी आपल्यासंबधानें नंतर विचार करीन. ( नजिबखानाकडे पाहून ) काय, नजिबखान तुह्मी कोणांवर चाल केली होती ?

**नजीब**—मी प्रथम फारसा लढलोंच नाहीं. पण, तो धाकटा पेशवा पडला आणि मराठे चवताळून आले, तेव्हां समशेरबहाद्दरावर चाल करून गेलों. खराच तो समशेरबहाद्दर. बाजीरावाच्याच पोटीं जन्म घेतलेला. त्यानें प्रथम मला असें जेरीस आणलें कीं माघार घेण्याचाच प्रसंग आला! त्यांच्याकडील ते तीर, बंदुकांच्या गोळ्या, सुतारनाला अशा कांहीं येऊं लागल्या कीं, दुसरा पर्जन्य वर्षावच! पण वेळेस अहमदखान पठाणानें चांगली मदत केली. मी पुढें लढत होतोंच: इतक्यांत तो हलकेच त्यांच्यांत शिरला आणि एकदम बाच्या व फिरंगाणाचा मार सुरू केला. तेव्हां त्यानींही पलुयाचा मार टाकून तलवारा, सुरे, पेषकबजे सावरली. एकच रणधूम माजली. आह्मी दहा बारा हजार मराठा होता कीं नव्हता असा केला. जिकडे तिकडे रूधिरस्राव दिसूं लागले. समशेरबहादरानेंही आमची पुष्कळ खराबी केली. माझा विचार त्याला जिवंत धरून आणावयाचा होता पण तो सिद्धीस गेला नाहीं.

**वजीर (शहाव०)**—मी ह्याच सुमाराला यशवंतराव पवारावर तुटून पडलों. धन्य त्या यशवंतरावाची. मी, दुंदेखान, शहापसंदखान, ह्या सर्वांनीं आपली शिकस्त केली. पण त्यांच्या तिरकमठ्याच्या, कडाबिनाच्या, आणि गारभांड्याच्या मारापुढें आमचा टिकाव लागेना. मग आह्मी थोडीशी कच खाल्यासारखें दाखविलें. तेव्हां तो एकटाच फार वेगानें आह्मावर आला; हें पाहून मीही त्यावर आपला घोडा घातला.

**दुंदेखान**—मी त्या वेळेस येऊन जर पवाराची गर्दन छाटली नसती, तर आपली भरलीच होती.

**वजी०**—मी ह्मणजे त्याला हार गेलों असतों थोडाच. पण तेंही बरेंच झालें. काय सांगावें वेळ प्रसंग असतो.

**अहमदशहा०**—मी त्या भाऊ पेशव्याकरितां सगळें रणमैदान हुडकून त्याशी टक्कर दिली. पण अखेर त्याचा पत्ताच नाहींसा झाला, तो पाडाव सापडायला पाहिजे होता. (बारदोखानाकडे पाहून) कां, तुह्मी कांहींच बोलत नाहीं.

बारदोर०-( लहान स्वरानें काशीराजास ) काशीराज, आतां कसें करावें ? तंबूवर झाडा गेल्यास सगळेंच बाहेर पडेल. मला वाटतें जनकोजी शिंदे वाचण्याची आशा करितात, पण ती व्यर्थ आहे. ते फारच घायाळ झाले आहेत. ह्यांतून वाचणें कठीण. तेव्हां त्यानांच नाहींसें करून आपलें संरक्षण करावें.

सुजा०—हो, हो, मलाही तसेंच करावें; असें वाटतें.

काशीरा०—पण हें घडणार कसें ?

सुजा०—आतां घडवून आणतों पहा. ( बारदोरखानास ) तुमची सुटका होतांच पहिलें काम शिंद्याचें बजावा.

अहंमद०—नबाब,काय चालला आहे आतां लपवालपवीचा विचार ?

सुजा०—सरकार जेथें कांहींच नाहीं, तेथें लपवालपवी कशाची ? आह्मी नजीबखानानें आह्मावर ही तोहमत कां घेतली, ह्याचा विचार करित होतो.

अहंमद०—( जोरदार शब्दानें ) ही तोहमत आहे काय ?

सुजा०—हुजूर खरोखरच ही तोहमत आहे. पाहिजे तर सरकारनीं आमच्या तंबूचा झाडा घ्यावा, ह्मणजे समजेल खरे कोण ह्मणत आहे तें. हुजूर, या नजीबखानाला अशा प्रकारची खोटी कुंभाडे वजीराच्या मनांत भरवून देण्याचे कारण तसेंच आहे. ( जिभ चावल्या सारखें करून ) पण जाऊंद्या, तें आपल्याला कशाला पाहिजे.

अहंमद०—कां असें चोरून कां ठेवितां ? काय असेल तें कळूं द्या तर खरें आह्माला.

सुजा०—इब्राहिमखान आपला जातभाई ह्मणून त्याला सोडून द्यावे, असें नजीबखानाचे ह्मणणें फार होतें. आह्मी त्याला ना कबूली दिली, आणि आह्मी ही हकीगत हुजूरला कळवूं असें सांगितलें. आणि ह्याच कारणांमुळें नजीबखानानें आह्मावर हा खोटा आरोप आणिला असावा.

अहंमद०—( नजीबखानाकडे पाहून ) काय नजीबखान, तुह्मी त्या

इब्राहिमखानाला सोडा ह्मणून ह्मणता ? ( सुजाबद्दल्याकडे पाहून ) पण नबाब, तुमचें हें ह्मणणें खरें कशावरून ?

**सुजा०**—आपण इब्राहिमखानाला आणवून समक्ष विचारावें, ह्मणजे हुजुरची खात्री होईल.

**अह०**—आणवा तर इब्राहिमखानाला.

**सुजा०**— ( बारदोरखानास ) बारदोरखान, आणा बरं त्या इब्राहिमखानाला. ( हळूंच ) तुमची सुटका मी करून दिली आतां पुढची सगळी व्यवस्था तुमच्याकडे आहे.

( बारदोरखान जातो. )

**नजीब०**—हुजुर ही सर्व लबाडी आहे. आपला खोटेंपणा लपविणसाठीं नबाब कांहींतरी सांगत आहेत. आतां ते ह्मणतातच, तर आणवा इब्राहिमखानाला. पण बारदोरखानाबरोबर आमचा माणूस पाठविला पाहिजे एक.

**अह०**—पाठवा पाहिजे तर, ह्मणजे मग शंकेस जागा राहणार नाहीं.

**नजीब०**—( फत्तेखास ) फत्तेखा; जा, जा, अगोदर बारदोरखानाबरोबर. ( फत्तेखा जातो. )

**अह०**—आतां मात्र हा घाटोळा मला माहित झाला. वाहवा नजीबखान 'गाजी ह्मणूत चांगलीच पाजीगिरी' दाखविणार होता तूह्मीं.

**वजीर०**—खाविंदानीं बारदोरखानाच्या तंबूवरही झाडा पाठवावा आतांच. ह्मणजे दोहोंचाही निकाल लागेल.

**अह०**—ठीक, ठीक; तसें तर केलेंच पाहिजे.( वजीरास ) बारदोरखानाच्या तंबूचा झाडा घेण्यास तुह्मीच जावे स्वतः.

**वजीर०**—हुजूरची आज्ञा. पण मजबरोर आणखी कांहीं लोक मिळण्याची मेहेरबानी झाली पाहिजे.

**अह०**—तुह्मास पाहिजे त्यांना बरोबर नेण्यास आमची मुळींच. हरकत नाहीं.

**वजीर॰**—ठीक आहे. येतों तर मी झाडा घेऊन.

( असें ह्मणून दोन तीन इसमास बरोबर घेऊन वजीर जातो. इतक्यांत एक सरदार प्रवेश करितो. )

**आलेला सरदार॰**—हुजूर मराठ्यांच्या तळावर सांपडलेले लोक, बायका, मुलें, हत्ती, घोडे, सामानसुमान, सर्व इकडे आणिले आहे

**अह॰**—बायकामुलांचें आपल्याला काय करायचें आहे. भारीभारी सामान व चांगले चांगलें दागदागीनें आणि रोकड ठेवून घेऊन बाकी सर्व टाकून द्या. आणि आणिलेल्या बायका मुलांना सोडून द्या. पण, नको इतक्यांत. मी येईपर्यंत तुह्मी तें सर्व तसेंच ठेवा. मी येतोच लवकर ती व्यवस्था करायला.

( आलेला सरदार जातो. इतक्यांत बारदोरखान प्रवेश करितो. )

**बारदोरखान**— ( आपल्याशींच ) माझ्या मांगे फत्तेखा लाविलात काय ! पण, मीही बस्ताद आहे समजलात. बाहेर येतो तोंच भेटला रणदुल्लाखा. त्याला सांगितलें कीं, जनकोजी शिंद्याचें डोकें कापुन लवकर जमिनी आड कर. तो तर कसला चलाख. मी सांगायचा उशीर, इतक्यांत गेला कामगिरी बजावायला. आतां ह्मणावं घ्यां झाडा. नजीबा, आमच्या तोंडावर गोड गोड बोलून असा गळा कापायला तयार झालास काय ? अरे, असा विश्वास घात ! ( थोडे थांबून ) बरं आहे, पुढची व्यवस्थाही किती सुरेख लागली. इब्राहिमखानाला सांगितलें कीं, “ तूं आमच्यांत येऊन मिळालास तर आह्मी तुला सोडून देऊं, असें नजिबखानानें कबूल केलें होते ” ह्मणून बादशहापुढें सांग. पण तो कोठे तेवढ्या नुसत्या सांगण्या बरोबर तें कबूल करायला. त्यानें साफ सांगितले कीं, मी असें खोटें बोलणार नाहीं. मग जेव्हां सांगितलें कीं, तुह्मी जर असें बोलणार नाहीं तर, जनकोजी शिंदे पाडाव सांपडले आहेत त्यांचा अंत होणार आहे. असें ह्मटल्यावर मग झाली कबूल एकदाची स्वारी.

( बारदोरखान कैद केलेल्या इब्राहिमखानाला पुढें करून )—

हुजूर हा इब्राहिमखान हजर केला आहे. आतां ध्या आपल्या मनाचा संशय काढून ( इब्राहिमखानाकडे पाहून हळूंच ) कां, मी सांगितल्याप्रमाणें सांगणार आहां ना? ( इब्राहिमखान नेत्रसंकेतानें तसें करीन, अशा प्रकारच्या खुणा करितों.)

**अहम०**—इब्राहिमखान, तूं हिंदुपासून उत्पन्न झालास कीं, आमच्या पासून? हिंदूस मिळालास ह्यांत तुला कांहींतरी जात्याभिमान असायला पाहिजे होता. आतां या नीच कृत्याबद्दल प्रायश्चित भोगण्याला तयार रहा. बरं तुह्माला ह्या नजीबखानानें सोडून देण्याचें आश्वासन दिलें होतें काय?

**इ०**—'जर तूं, आह्माला येऊन मिळशील तर तुला सोडून देऊं' असें नजिबखानाचें ह्मणणें होतें.

**अहं०**—बरं, सुजाउद्दवला ह्यांचा ह्या संबंधीं काय विचार होता? ( सुजाउद्दवला आपल्यास अनुकूळ बोलण्याविषयीं नेत्र संकेतानें इब्राहिमखानास खुण करितो. इब्राहिमखान ती खुण पाहून. )

**इ०**—नवाब आपल्याला कळविल्यावांचून, कांहींच करण्याला तयार नव्हते.

**अहं०**—एकूण नजिबखानाची ही नजिबी चांगलीच आहे ह्मणायची.

( इतक्यांत वजीर दोन चार इसमासह प्रवेश करून व बादशहास मुजरा करून. )

**व०**—हूजूर, आपल्या ह्मणण्याप्रमाणें बारदोरवानाच्या तंबूचा झाडा घेऊन आलों, पण नजिबखान ह्मणतात त्याप्रमाणें तेथें कांहींच नाहीं.

**नजि०**—( घाईनें ) वजीर काय म्हणता! कांहींच नाहीं तेथें.

**व०**—माझी तर अशी खात्री झाली आहे कीं, तमचें ह्मणणें अगदींच खोटें असावें.

अहं०—वजीर, तुमची खात्री झाली ना तशी !

वजीर०—हो, हो, झाली. कारण नजिबखान म्हणतात त्यांतला. प्रकार त्या ठिकाणीं मुळींच दृष्टीस पडला नाहीं, किंवा तसें कांहीं असेल असेंही मानण्याला कांहीं आधार दिसत नाहीं.

नजिब०—वजीरसाहेब, आपण असें म्हटल्यावर माझा निरूपाय आहे. कारण मी प्रत्यक्ष त्या ठिकाणीं जनकोजी शिंद्याला पाहिलें होते.

मु०—( आपल्याशींच ) अरे नजिबा, मजवर आणि बारदोर-खानावर आणिले होतेस नाहीं भलतेंच संकट ! असा विश्वासघात ! अरे, आमच्यांत कबूल करितोस एक आणि वजिराला सांगतोस एक. बरं आहे भोग आपल्या ह्या विश्वासघाताची फळं आतां.

बाद०—( नजिबखानाकडे पाहून ) नजिबखान, तुह्माला हें असें करणें योग्य नव्हते. तुमच्या या दुष्ट कृत्याबद्दल तुह्माला योग्य शासन झालें पाहिजे.

नजिब०—हुजुरनेंच असें ह्मटल्यावर मग काय म्हणायचे आहे. पण माझी अद्यापही अशी खात्री आहे कीं, बारदोरखानाच्या तंबूंत जनकोजी शिंदे असले पाहिजेत अथवा त्यांना दुसरीकडे कोठें तरी छपविले असले पाहिजे.

वजी०—मला जितकी खात्री करून घ्यायची होती तितकी मी करून घेतली आहे.

सुजा०—वजीरसाहेब, पहा; आपली प्रत्यक्ष खात्री झाली आहे, तरी देखील ननिबखान आम्हावर आरोप ठेवितच आहे.

नजिब०—नबाब, हा आरोप आहे काय ? प्रत्यक्ष मी आपल्या डोळयांनीं जनकोजी शिंद्याला बारदोरखानाच्या तंबूंत पाहिले असून, आपली ती लबाडी छपवून मजवर भलताच दोष आणिता काय. ठिक आहे, पाहून घेईन या बद्दल. हा नजिबखान आहे समजलात?

वजी०—हुजूर, मला अजूनही ह्या बारदोरखानाबद्दल संशय आहेच. त्याचा तपास करण्यास मोकळीक असावी.

अहं०—याचा तुह्मी चांगल्या रीतीनें तपास करा. सर्व खरें समजलें पाहिजे. ह्या लबाड्या आणि फितुऱ्या काय उपयोगी! ह्यांच्या योगानें राष्ट्रेंची राष्ट्रें नाश पावतात.

बार०—(वजिरास) प्रत्यक्ष झाडा घेतल्यावरही माझ्याबद्दल संशय! फारच चांगलें.

अहं०—असा आपापसांत कलह करण्यांत काय अर्थ आहे? दोघांचा कलह ह्मणजे तिसऱ्याचा फायदा. तेव्हां तुह्मी कोणीच असें करूं नका. सर्व एक दिलानें वागा.

वजि०—आतां तें होणें नाहीं. मी या नबाबाचा आणि बारदोरखानाच्या ह्या कृत्याबद्दल सूड घेणार सूड.

सुजा व बारदोर०—आणि आह्मी कांहीं हातांत कांकणें नाहीं भरलीं. होऊंद्याच तुमचे आमचे दोन हात.

अहं०—तुह्मी कोणीच असें रागास चढूं नका. थोडें शांत व्हा व विचार करा. आपण असें केल्यावर मग आपला निभाव कसा लागणार. (इब्राहिमखानाकडे पाहून) बर, ह्या इब्राहिमखानाला कांहीं दिवस अटकेंत असूंद्या मग त्याबद्दल विचार पाहूं.

इब्रा०—मला मुळींच जिवाची आशा नाहीं. माझा एकदम निकाल करावा.

अहं०—इब्राहिमखान, अझूनही तुझ्या डोक्यांतील वेड जात नाहीं ना? ठिक आहे. करतोच बं, आतां तुझा निकाल! पण तो तूं ह्मणतोस तसा एकदम मात्र नाहीं करायचा. कुजून कुजून मेला पाहिजेस तूं. (उदेखास) उदेखा ने त्याला आतां बाहेर आणि मी सांगेन त्या प्रमाणें छळछळून आणि हाल हाल करून, पाठव यमसदनाला. मी आतां रणसंग्रामांत सांपडलेली लूट व लोक यांची व्यवस्था पहायास जातों. (बादशहा उभा राहतो इतक्यांत पडदा पडतो.)

## प्रवेश २

स्थळः—पानपताचे रणमैदानाजवळील अहमदशाहाचा बंदिखाना.

( हातांत बिड्या आहेत असा आनंदराव पवार प्रवेश करितो. )

आनंद०—ईश्वरा, तूं आह्मा मराठ्यांवरची दयार्द्र दृष्टी कां नाहींशी केलीस! आह्मी असें कोणतें अनीतीचं वर्तन केलें होतें, तर आमची अशी दुर्दशा केलीस! स्वधर्मरक्षण करणें, हेंच आमचें कर्तव्य; आपल्या पूर्वजांचा अभिमान बाळगणें, हीच आमची जीवीतता; देशबांधवांच्या सुखारितां आपलें प्राणही देणें, हेंच आमचें दातृत्व; आपल्या देशांत परोत्कर्ष न होऊं देणें, हाच आमचा स्वाभाविक मनोधर्म; स्वदेश उन्नतावस्थेंत पाहणें, हाच आमचा खरा उत्साह; खळांच्या शासना करितां तलवार चमकत राहणें हेंच आमचें शौर्य; आणि तुला तेंच सहन झालें नाहींना? ( थोडा वेळ थांबून ) हर हर!! ह्या पानपतच्या संग्रामांत आह्मा मराठ्यांची झालेली स्थिति ऐकून आमच्या शत्रूंच्या नेत्रासही यापुढें आश्रुपात येतील, मग जे हिंदू, हाडाचे अस्सल मराठे, ज्यांना शिवरायानें स्थापिलेल्या गादीचा अभिमान, ते ह्या भरतभूस नयनादकानें डबाबून सोडतील ह्यांत नवल काय? ( पुन्हा थोडा वेळ थांबून ) हाय! हाय! आमच्यांतील वीरशीरोरत्नें रावसाहब व भऊसाहेब स्वर्ग सुखवाशी झाले. सेनासागराचे पालक शिंदे, पवार आणि तसेच मोठ मोठे रणझुंझार वीर युद्धांत थकल्यामुळें अक्षय असें विश्रांतिसुख घ्यावयास स्वर्गलोकीं गेले. व आमच्या राहिलेल्या सेनेनेंही फक्त स्वाभिमानास्तव समरभूमीवर शयन केलें. आहा! तसाच हा पवार समरभूमीवर पडतां, तर ह्या शिखानष्टांचा बंदिवान कां झाला असता? काय, मला लोक ह्मणतील तरी काय? कीं, पवार आणि गिलच्यांचा कैदी! हाय! हाय!! या पेक्षां मृत्यु बरा! अहमदशहा, तूं ह्या पवाराची गर्दन गुप्तरीतीनें येथल्या येथेंच छाटून टाक!. ह्मणजे माझ्या नांवाला काळीमा तरी लागणार नाहीं. पण छे, अहमदशहा आमचा शत्रु आहे. तो असें कसें करील! तो ह्या पवाराची चांगली धींड मिरवून आणि शोभाकरून मग प्रसिद्ध रीतीनें माझें डोसकें या धडापासून वेगळें करील., परमेश्वरा, अशा निंद्यप्रकारचा मृत्यु मला येणार ना? असा मृत्यु येण्यापेक्षां मला आपल्या हातानेंच आपल्या

छातींत कट्यार भोसकून अंत करून घेतां आथ्र तर किती बहार होईल. पण या जड श्रृंखळांचें बंधन कसें मोकळें होणार ? नाहीं, नाहीं; जड श्रृंखळांचें बंधन तुटल्यावर मग आत्म हत्या नांव कशाला ! पांच दहा लोडग्यांना चांगला हात दाखवून मग पाहिजे तर मी क्षात्रधर्मानें पावन होईन.

हो, हें सर्व ठीक; पण माझ्या आनंदीची काय वाट झाली असेल? माझी वाट पाहून ती थकली असेल, आणि मी आलों नाहीं हें पाहून तिनें आपला अंत करून घेतला असेल. प्रिये, असें करितांना तुला माझें स्मरण झालें असेल नाहीं. प्रिये, तूं खरोखर अशारीतीनें अंत करून घेतला असलास तर आपल्या पातिव्रत्याचरणाला आणि मजवर असलेल्या प्रेमाला अनुचित असेंच केलेस, आणि मी मात्र तुझ्या प्रेमाच्या मोबदल्यारितां, नुसतें दुःखाश्रू ढाळीत आहे ना ! आतां मला लवकर मरण येईल तर फार बरं होईल ह्मणजे मी स्वर्गलोकीं तरी आपल्या प्रियेची भेट घेईन.

( इतक्यांत एक पहारेवाला बाहेर येतो )

**पहारेवालाः**—का बाबा, रडतोस का ? आतां सर्वांची आशा सोड. प्रेमाला आणि मायेला आपल्या हृदयांतून बाहेर काढून मन घट्ट कर. आणि आपल्याला सगती मिळण्या करितां इश्वराचें चिंतन कर. आतां एक प्रहराच्या अवधींत तुझें हें शिर, ह्या धडापासून वेगळें होईल. बादशहानें पेशव्यांकडील सांपडलेल्या सर्व लोकांची सारखी कत्तल चालविली आहे.

**आनं०ः**—शिपाई बोवा, मी मरणाला मुळींच भित नाहीं. मला जें वाईट वाटत आहे तें फक्त ह्या निंद्य मृत्युबद्दल आणि माझ्या प्रियेची काय अवस्था झाली असेल ह्या बद्दल. तीनें जर, आपला अंत करून घेतला असला तर चांगलेंच झालें. पण, जर कां ती मज प्रमाणेंच-

**पहा०**— कायहो, तुम्ही जे आपल्या प्रियकरणी करितां इतके हळहळत आहा ! तेव्हां ती बरीच लावण्यवती असून तुमच्यावर पूर्ण प्रेम करणारी असेल नाहीं ?

**आनं०**—अलबत.

पहा०- कदाचित ती रूपवती असेल पण तुम्ही ह्मणतां त्याप्रमाणें तुमच्यावर, ती अनुराग करणारी असेल कीं नाहीं हें सांगता यावयाचें नाहीं; आणि मी ह्मणतों हीच जर ती असेल तर तुमचें ह्मणणें अगदीच निरर्थक आहे.

आनं०-ह्मणजे, तुम्ही कशावरून? आणि काय ह्मणता?

पहा०-एक पंधरा सोळा वर्षांची सुंदर रूपवती स्त्री बादशहास सांपडली असून, ती बादशहाच्या तंबूत आहे आणि इतकेंच नव्हे तर ती बादशहावर आषक्त झाली आहे. आणि माझी समजूत तर खास अशी आहे कीं, तीच तुमची मनरमणी असावी. तुम्ही आनंदराव पवार आहात का?

आनं०-आनंदराव पवार! हा एकदम असें काय विचारतो बरं.

पहा०-आहो आश्चर्यचकित कां होता. मी आनंदराव पवाराची बायको आहे असें ती सांगत आहे,

आनं०-काय ह्मणता, मीं आनंदराव पवाराची बायको आहे ह्मणून ह्मणत आहे. आणि ती बादशयावर आषक्त झाली आहे?

पहा०-हो, हो, ती तमचीच अर्धांगी असावी अशी माझी खात्री होत आहे, आणि तीचें असें आचरण पाहून मला फार वाईट वाटत आहे.

आनंद०-आनंदी, तूं इतकी निमकहराम झालीस काय? आग दोन दिवसाच्या आंत इतका फरक! (रागाच्या आवेशानें) स्त्री जात तेवढी बेहराम! त्यांच्याजवळ सत्याचा लवलेश सापडायचा नाहीं! प्रेमाचा निश्चय राहावयाचा नाहीं आणि निश्चयाचा बिंदू मिळायचा नाहीं! आहाग कुलांगार दिवटे! आतां जर मजसमोर असतीस तर एका मुष्टीघातानेंच तुझें मस्तक छिन्न विछिन्न करून नरडीचा घोट घेतला असतां:—

पहा०-अहो शहाणे, तुम्ही आहात कोठें? आणि ओरडतां केवढ्यानें. चला व्हा अंधार कोठडींत. थोडेसें बाहेर येऊं दिले ह्मणून असें करतां कीं काय?

*(असें ह्मणून त्याला आंत नेऊं लागतो)*

आनं०-अरे, अधमा, तूंच मला ती हकीगत सांगून त्वेष आणलास आणि आतां पुन्हां असें ह्मणतोस काय? (असें ह्मणून त्या दोघांची

खिमामस्ती होते व त्या झटपटीत आनंदरावाच्या पायांतील शृंखळा तुटून मोकळ्या होतात व आनंदराव तेथून निघून जातो.

---

### प्रवेश ३

स्थळ पुणें येथील पेशव्यांच्या वाड्यांतील चौक—राघोबा दादा एकटेच उभे आहेत.

राघो०—यवनांचा उत्कर्ष आणि पेशव्यांच्या नांवाला कालिमा! कोण हें सहन करणार! कितीही ग्रहकलह असला, तरी तो आमचा आमच्यांत, ह्मणून परक्यांच्या हातून झालेला नाश! हें तर कालत्रयीं नाहीं खपणार! असें करून रायांनीं व अप्पांनीं जी कीर्ति संपादन केली, ती त्यांच्याच मुलांनीं घालविली असें लोकाकडून म्हणवून घेऊं आणि जिवंत राहून वसुंधरेला भार होऊं? हर हर! याहून अपमान तो कोणता? आणि निर्लज्यपणा तो काय? असें झाल्यावर स्वर्गलोकीं प्रत्यक्ष आमचे वडील आह्माला षंढ समजतील. आमच्या पोटीं जन्माला कशाला आलात असेंही ह्मणतील; आणि आमच्यावर क्रोधानें संतप्त होऊन जर मर्त्यलोकीं असतो, तर असल्या नेभळ्या पुत्रांना आपल्या हातानींच यमाचे स्वाधीन केलें असते; असें म्हणून निरूपायानें तळमळूं लागतील. पुत्रानें स्वर्गी गेलेल्या वाडवडीलांना आनंद द्यावयाचा कीं दुःख! दुःख देणारा पुत्र अधमाहून आधम!! पण आमच्या या आचरणानें रायांना तेंच होणार ना? धिःकार! धिःकार! अशा पुत्रांना! मीं जर रायांचा खरा पुत्र असेन, तर विश्वासराव व भाऊसाहेब या रणशार्दूलांना मारल्याचा सूड गीलच्यांना धूळ चारून व अहमदशहाच्या रक्तानें हे हात भिजवून पुरा उगवीन आणि रायांना आनंदभरीत करीन! हे स्वर्गस्थ देवतांनो, मीं असें करीपर्यंत तुम्ही त्यांचें शांतवन करा. अहमदशहा, आलों, आलों; तुझा सूड घ्यायला. अरे, तूं पेशव्यांच्या दोन विरानां नाहिसें केलेंस; सापडलेल्या मराठे बहादरांची कत्तल केलीस; आमच्या ह्या आर्यभूचा अभिलाष धरिलास; आणि आमची राज्यलक्ष्मी भ्रष्ट करण्याचा यत्न चालविलास! तुझी ही कृती पाहून, ज्यांच्या मनांत स्वाभिमान उत्पन्न होणार नाहीं, ज्यांना आवेश येत नाहीं,

ज्यांचे बाहु फुरण पावणार नाहींत. आणि जे धगधगींत खड्गाला हात घालून आपल्या एवढ्या विनाशाबद्दल शत्रूबरोबर उसन्या घाई भुजण्यास निघणार नाहींत; ते वीर पेशव्यांचे अभिमानीच नव्हेत व ते हाडाचे अस्सल हिंदूही नव्हेत आणि त्यांना आपल्या आर्यधर्माचा स्वराष्ट्राचा आणि स्वकीर्तीचा प्रभावच ठाऊक नाहीं. ह्या पानपतच्या रणसंग्रामाची कल्पना मनांत येताच हें माझें मस्तक भणाणून जाऊन क्रोधानें संतप्त होतें. अंगावरील रोमांच थरारून सजीव होतात. ह्या स्नायू स्थूल होऊन शरीर फुगूं लागतें. ह्या हातांची मुठी तरवार धरण्यास शिव शिव करितात. आणि अंतःकरणांत यवनांचा चकाचूर करणाऱ्या विचारांचा कल्होळ होऊन जातो; व जिकडे तिकडे रक्तपात आणि सूड! सूड! हेंच दिसूं लागतें. हे स्वर्गस्थ यक्ष गंधर्वांनो, तुम्ही आपला अतुल प्रताप माझ्या ठायीं प्रदीप्त करा; हे सहस्ररश्मी दिवाकरा तुझें तें प्रखर तेज माझ्या शरीरावर चमकूं दे. हे दिक्पाळांनों, ह्या माझ्या शरीराचें संरक्षण तुम्हाकडून होऊं द्या; हे अग्निनारायणा, तुझी ती जाज्वल्यता माझ्या ठायीं वसू दे; हे वायो, तुझें तें चापल्य मला मिळूं दे हे भीमकर्मा वृकोदरा तुझ्या पराक्रमाचें स्मरण मला वारंवार होऊं दे, आणि हे दुष्ट पिशाचराक्षसांनों, तुमचा तो दुष्टपणा माझे हातून हें घोरकर्म करण्याला. कांहीं वेळ मजकडे येऊं द्या. म्हणजे हां हां म्हणतां त्या भ्रष्टांना ह्या लोकांवरून हुसकावून देऊन शेवटीं त्यांनीं केलेल्या घोर पातकाचा यमधर्माजवळ झाडा देववून कृतकृत्य होईन तरच नांवाचा राघोबा! नाहीं तर जन्माला येऊन व्यर्थ! व्यर्थ! मातेला आणि पित्याला श्रम! सूड! सूड! (जातो.)

---

## प्रवेश ४

**स्थळ**—पुणें येथील पेशव्यांचा वाडा कांहीं सरदार बसले आहेत.

**नाना०**—अहा रे, माझ्या शूरांच्या बच्चांनो, हें तें पानिपतचना, तर मग असें स्तब्ध कां बसलांत. (तरवारीस हात घालितात.) उडवा उडवा ह्यांची डोसकी. आमचे ते सुभेदार मल्हारराव होळकर कोठे आहेत! त्यांना बगावें. करा करा, पेशव्यांशी कसूर.

बांडे०—छे, सुभेदार हल्लीं येथें नाहींत.

नाना०—मग, ते ते, कोण लांब दाढींचे मिया साहेब.

बाबु०—काय करावें बुवां आतां ह्यांना.

नाना०—(आकाशाकडे पाहून) अरे, तो पहा विश्वास कसा स्वर्गलोकीं चढत आहे तो. बाबा विश्वासा, ती नाहीं रे स्वर्गाची वाट. इकडे ये इकडे. तूं स्वर्गलोकीं रहा आणि मी वर जातो. बैस, बैस येथें; (जवळ असलेल्या सरदारास गादीवर ओढीतात.)

बांडे०—सरकार, हें काय? आपण थोडा विचार करा.

(राघोबा दादा येतात.)

नाना०—(राघोबास पाहून) आला, आला; माझा भाऊ. (पुन्हा पाहून) हो, हो, तोच तो; भाऊ, भाऊ, कुठें रे ती स्वर्गाची वाट? नको, नको; नकोच चुकूं ती. हा पहा अबदल्ली त्याच रस्त्यानें जात आहे.

राघो०—(सखेदाश्चर्य होऊन.) नानासाहेब, आपण हें असें काय करितां? भाऊ गेले आहेत स्वर्गलोकींचें सुख भोगायला आणि तुह्मी आह्मी मात्र राहिलों आहोंत ही अकीर्ति ऐकायला आणि हे क्लेश सोसायला.

नाना०—काय, काय; तूं भाऊ नाहीस. तर, मग तुझें येथें येण्याचें कारण. हं अहमदशहा—

राघो०—नानासाहेब, हा आपला राघू आहे; आपण असळ शांत व्हा.

नाना०—हो, हो, झालोच शांत. पण उचल तलवार. घे, घे; भाऊचा सूड. अरे, गेला तो. आणि तो चोरासारखा उभा कोण? कोण ह्मणजे तूं तोच;

राघो०—(दुःखानें) नानासाहेब, आपण असें करायला मला तरी कशाला जीवंत ठेवितां. आणि खरोखरच आपण पानपतावर जाण्यास सांगितलें तेव्हांच जातो, तर हे आज पहायला तरी का लागतें. ईश्वरा, काय तुझा हा आह्मांवर कोप! आमचे पाठिराखे भाऊसाहेब आणि तुजसेच एकादे वेळीं विश्रांती देणारे विश्वासराव आम्हांपासून दूर केलेस.

तसेंच शिद्यासारख्या स्वामीभक्ताला मरणोत्तरही तेंच ब्रीद राखायला लाविलेस. आमचे सगळेच आधारस्तंभ उपटून टाकिलेस आणि सर्वांचे पालकाची आज ही अशी स्थिती केलीस. आणि तें सर्व एकण्याचा व पहाण्याचा प्रसंग मजवर आणिलास! खचीत नको, नको हा मला जीव! पण छे! हे काय राघोबा! नुकत्याच केलेल्या घोर प्रतिज्ञेचें स्मरण कर. क्षत्रियांना शोक करणें उचित नव्हे. (थोडा वेळ थबून व बाबुजीनाइकाकडे पाहून) नाईक परमेश्वरानें आम्हांवर मोठा कठीण प्रसंग आणिला आहे. आतां ह्यांतून तुमच्याच बळावर पार पडायचें आहे. नानासाहेबांची तर अशी स्थिती झाली. आणि पानपतकडची तशी व्यवस्था आहे. पण ह्या वेळेस जर त्या शिखानष्टांचा उत्कर्ष होऊं दिला, तर ते हां हां ह्मणता आपला एक एक प्रांत काबीज करून ह्या पेशव्यांच्या राज्याची ह्या आर्यधर्माची आणि आपल्या पूज्य देवतांची धूळधाण उडवतील; ह्मणून आपण त्यांचा समाचार घेऊन त्यांना आपल्या या राष्ट्राच्या सीमेपार केले पाहिजे. अशा संकटसमयीं हें तुह्मास फारसें कठीण वाटत असेल पण वीरांना तें तसें वाटतां कामा नये. त्यांनीं मारतां मारतांच आपली गती लावावी. पण जीवाच्या आशेनें क्षात्रधर्माविरूद्ध भेकडपणा पतकरूं नये. मला तर ह्या गिलच्यांनीं केलेली एकेक निंद्य कृती आठवली ह्मणजे त्यांचा केव्हां सूड घेईन असें होऊन जातें. आणि मी आतां तो घेण्याला जाणारच. तुम्ही नानासाहेबांना औषधोपचार करा व पर्वतेश्वराला रुद्रावर्तनाचें अनुष्ठान बसवा. तारणार किंवा मारणार तोच समर्थ आहे आपणा पामरांच्या प्रयत्नांनी काय व्हावयाचे आहे. अशा प्रसंगी मी नानासाहेबांना सोडून जावें हें अयोग्य तर खरेच, पण गिलच्यांचा सूड न घेणें, हें त्याहूनही अयोग्य आहे. माझ्या ह्या जाण्यानें मी निर्दय असें लोक मला म्हणतील तर मी तें सहन करीन; पण ही झालेली अकीर्ति आणि त्या शिखानष्टांचा उत्कर्ष नाहीं मी सहन करणार. आतां जास्त सांगायला नकोच. तुह्माला ह्मणजे नानासाहेबांची काळजी नाहीं असें नाहीं. मला वरचेवर पत्रें मात्र पाटवीत असा. (नानासाहेब बडबडू लागतात.) न्या, न्या, *त्याना आंतां आंत.* आणि स्वस्थ निजूं द्या. वयनीला सांगा कीं मी पानपतला गेलों ह्मणून. आतां त्यांना विचारण्याला येण्याला वेळ नाहीं

( सर्वांकडे पाहून ) आमचे मराठे बहादर कोण कोण आहेत बरोबर यायला तयार. ( बाबुजी नाईक नानासाहेबांना उठवितात )

नाना०—चालो. भाऊ, तू कोणीकडे रे बोलत आहेस. हां हां तिकडे कां ( नानासाहेब व त्यांच्यामागे बाबुजीनाईक व दोन तीन मंडळी जातात )

राघो०—काय ह्या हिंम्याची ही दशा. असो, सरदारहो; आपणा सर्वांची ही म्लान वदनें पाहून लोकांना आपणांस वीर ह्मणण्याची शंका उत्पन्न झाली आहे. ज्या वीरांना विजयश्री मिळाली असते. ते आनंदानें डोलूं लागतात. त्यांचे स्वर्गस्थ वाडवडील पुत्रांची कीर्ति ऐकून मोठी धन्यता पावतात. अप्सरा आणि देवगण अंतरिक्षांतून त्यांच्यावर पुष्प वृष्टी करितात; आणि सर्वत्र भूमंडलावर त्यांची ख्याती होते. तेंच अपयश आले तर त्या योद्ध्यांची मस्तकें क्रोधानें भणाणून ते प्रतिकृतांतांप्रमाणें दिसूं लागतात व शत्रूंना कंठस्नान घालणाऱ्या प्रतिज्ञा करितात. हा त्यांचा निश्चय पाहून त्यांच्या मृत पूर्वजानां विजयश्रीनें प्राप्त झालेल्या आनंदाहून अधिक धन्यता वाटते. व ते स्वर्लोकाहून शाबास, शाबास, ह्मणत असतात तसेच स्वर्गींचे देव त्यांचा हा कृत संकल्प पाहून, आश्चर्य चकीत होतात. व रण मैदानाच्या आकाश मार्गीं त्यांच्यावर पुष्पांजुली टाकण्या करितां, त्यांना विजय मिळण्याची वाट पाहत असतात; आणि भूलोकीचें जन त्यांचें तें विलक्षण धैर्य पाहून थक्क होतात. व त्यांची कीर्ति गातात. पण जे युद्धातून पराङ्मुख होतात, जे शत्रूंचा उत्कर्ष साहतात, त्यांचे मनच त्यास खात असतें. त्यांची पितरें त्यांना धीःकरितात देव आणि देवांगना त्यांचा भित्रेपणा पाहून नाकें मोडतात. आणि जिकडे तिकडे अपकीर्तीचा डंका गाजतो. मग आपल्यावर अशा प्रसंगीं ह्या सर्वांचा कोप झाल्यावांचून राहिला नसेल. त्यांतून आपण सजीव आहोंत तोंपर्यंत ह्या अपयशा बद्दल खरें मराठी राज्याचे अभिमानी, आर्य धर्माचे कट्टे भक्त, आणि स्वदेशाची उन्नती इच्छिणारे महात्मे तर आपणाला कुशब्दांनीं बोंचतील. व तें मरणाहून मरण होईल. ( थोडा वेळ स्तब्ध राहतात. कोणीच बोलत नाहीं तेव्हां. ) वीरहो, नाहीं, नाहीं हे तुमच्या मनास

मित त्या यवनांनीं तुमच्या चार लक्ष जातीबांधवांचे कंठ करकस कापिले, तुमची मुबलक संपत्ती लुटून नेली, तुमच्या देशांतील सुंदर स्त्रीरत्नें हिरावून घेतली. तुमच्या राज्यलक्ष्मीवर त्यांनीं डोळा ठेविला आणि तुमचा धर्म भ्रष्ट करण्याचा ते यत्न करितात हें प्रत्यक्ष तुह्मी डोळ्यांनीं पाहून षंढाप्रमाणें खालीं माना घालितां! तुमच्यातलें तें शौर्य, तें क्षात्रतेज आणि तो देशाभिमान गेला तरी कुठें! पहा, उद्यां तुमच्याच स्त्रिया व मुलेंही तुह्मांला हसूं लागतील; व तुमची निंदा करतील. त्यांनाहीं वीरपत्नी आणि वीरपुत्र ह्मणवून घेणें फार आवडतें. वीरहो, तुह्मीं ह्या आर्यजननींचें खरे पुत्र असाल, तर तुमच्यात थोडा तरी अभिमान उत्पन्न करा आणि त्या शत्रूंच्या अनेक नीचकृत्या डोळ्यापुढें आणा. ह्मणजे तुमचें अंतःकरण क्रोधानें करपून जाईल! तुमचें शरीर स्फुरण पावेल. आणि त्या यवनांचा सूड घेणाऱ्या विचारांनीं तुमच्या मज्जातंतूंत एकच गोंधळ उडून जाईल. आणि तुह्मी खड्गास हात घालाल आणि जिकडे तिकडे शत्रूंच्या रक्तांचें पाट वाहवयास लावूं अशी घोर प्रतिज्ञा तुम्हीच कराल.

शितोळे:—दादा साहेब, गिलच्या ह्मणजे कांहीं सामान्य नाहीं आजला. आपण पहिल्या हिमतीवर हें भाषण करित आहा; पण आपल्याला आतां कोणाचें पाठबळ तरी आहे कां? शिंदे गेले, पवार गेले. समशेर बहादर गेले, इब्राहीमखान गार्दी गेले, मेहेंदळे गेले, सांगावेत तरी किती! आतां राहतांपैकीं तुह्मी आह्मी आणि हें बांडच राहिले आहोंत कीं नाहीं डोके हालवायला. बरें, आपल्या जवळ अशी सैन्यसामुग्री तरी किती उरली आहे. आववी पन्नास साठ हजारचना. आहो, चारलक्ष सैन्य आणि मांडीस मांडी देऊन भिडणारे योद्धे त्यांचा शेवट तसा झाला. आता—

दादा०—शितोळे, काय हे नामर्दपणाचे विचार! बांडे, तुमचें काय ह्मणणें आहे?

बांडे०—ह्मणणें काय असायचं. सुभेदार मल्हारराव होळकरासारख्याची जेथें ती अवस्था तेथें आह्मी काय करणार. बाकी धन्याचा हुकूम होत असेल तर तयार आहे हा आपल्या बरोबर यायला.

दादा०—आहो, रडत रडत घोड्यावर बसवून मग तो काय तरी मारणार! बरे आहे; बांडे, शितोळे, तुह्माला अजूनही शत्रूंचा सूड घ्यावा असें वाटत नाहीं ना. धिक् धिक् तुमचें जिणें! तुह्मी आतां हीं अपेशानें काळी ठिक्कर झालेलीं तोंडें दडवून ही आर्यभू निर्वीर झाली असें करणार ना! आणि तिला कलंक लावणार ना! अहो, आपणा हिंदूंच्या स्त्रियांही त्या दुष्टांच्या नीचतेची सीमा पाहून क्रोधानें जळफळत जमीनीवर हात चोळून त्यांचे वाईट चिंतितात! पण तुह्माला तसेंहि वाटत नाहींना? काय हा तुमचा नामर्दपणा! त्या विधात्या कडून तुमची ही नरतनु करण्यांत चूक झाली असावी. आतां हातांत कांकणें भरून वेषांतर करा. ह्मणजे यापुढें जर शत्रूंनीं तुमच्यावर चाल केलीच तर एका एकी मारले जाणार नाहींत. ते तुह्माला स्त्रिया ह्मणून सोडून देतील. किंवा आपल्या गोटांत खेचतील. आणि तेथें तुमचें खरें रूप बाहेर पडल्यावर एकंदर हिंदुच्या नांवाला चांगलेंच भूषण येईल! व आपली कीर्ति आजरामर होईल! नका येऊ कोणी तुह्मी आतां. हा राघोबा वेषांतर करून अबदल्लीकडे जाणार आणि संधी साधून गिलच्यांचा सूड उगवून घेणार! रहा, रहा; तुह्मी जीवंत रहा! ( जाऊं लागतो )

बांडे०—दादासाहेब आमच्यांत कांहींच पाणी नाहीं असें आपण समजता काय? बरे आहे. पहा; महादेव नरतनु करण्यांत चुकला आहे कीं काय आहे ते. हा आपणा बरोबर येण्याला तयार आहे. हजार पांचशें शत्रूंना हात दाखवून नामर्द आहे कीं, मर्द आहे हे आपल्याला दाखविणार.

शितोळे०—दादासाहेब, आपल्या ह्या भाषणांनीं आमचीं काळजें दुभंग झालीं. आह्मी इतका वेळ केवळ आतां कितीहि लढलों तरी जय प्राप्तीची आशा नाहीं, ह्मणून स्तब्ध बसलो होतों. पण आतां जी एवढ्या सैन्यांनीं गती मिळवीली तीच भिळविण्यास निघणार आपणा बराबर. आह्मी मरणाला भितो असें मुळींच नाहीं. मरण हें केव्हांना केव्हां तरी येणारच. तेव्हां तसें होण्यापूर्वी आमच्या ह्या काळ्या ठिक्कर झालेल्या तोंडाचा प्रभाव तरी दाखवूं.

दादा०—शाबास माझ्या वीर हो, तुमची ही वीरश्रीची भाषणें ऐकून जो आनंद झाला आहे, तो शब्दांनीं वर्णन करितां येणार नाहीं. तुमचा हा उत्साह पाहून मी आज त्या झाल्याचा पुरा समाचार घेतला असेंच समजतों. उत्साह असल्यावर काय होणार नाहीं. मारी उडवू त्या गिळध्यांची कत्तल. बरं आहे आता, आतांच्या आतां निघण्याची तयारी करायची आपली. तुह्मी आणि इतर लहान मोठे सरदार ह्यांनीं आपल्या सैन्यांत ही वर्दी द्यावी. खर्चास कोणास टंचाई असेल तर तसें मला कळवा खर्चाच्या कामीं मुळींच मागें पुढें पाहूं नका. आज इतका नाश झाला तो आता आपणास जय मिळाल्यास सर्व भरून येईल.

बांडे०—आणि जिकडे तिकडे कीर्ति गाजेल.

शि०—मेलोंच तर वीरांची गती पावूं.

दादा०—मरण! मरणाचें नांवही नको! अहो, युद्धास जातांना ज्यांच्या दृष्टी पुढें मरण दिसूं लागतें त्यानाच तें प्राप्त होतें. मरणाची ज्यांना कल्पनाच नाहीं ते त्या युद्धांत अमरच होतात. बरें; आपणाला जावेल तितके लौकर गेलें पाहिजे. कारण दुराणी आनंदानें आणि निर्भयपणानें चैन भोगीत पडले असतील. त्यांना तसें गाठलें कीं आपले हेतु गेलेच सिद्धीला.

बांडे व शितोळे०—चला तर चला, युद्धाची नौबत करून सगळ्या सरदारांना आणि सैन्याला हुकूम करूं निघण्याचा.

( जातात. )

( पडदा पडतो. )

प्रवेश ९

स्थल—पेशव्यांच्या वाड्यांतील मागील बाजूचा दिवाणखाना. आनंदी बाई एकटीच बसली आहे.

आनंदी०—प्रेम! प्रेम उत्पन्न करणें सगळें आमच्या कडे आहे. थोडं रुसावं नाहींतर ओढून चंद्रबळ आणावं. ह्मणजे लागलेच पुरुष समजूत करायला. बरं अशी समजूत घातल्यावर आह्मी लागलेच त्यांच्याशीं प्रेमानं बोलतो कीं काय? त्यांना अर्जवें करायला लावायचं. हें प्रेम वर वरच आहे म्हणून ह्मणायचं, आणि सांगितलेलं ऐकवायचं. कसं पण पुरुषांना देवानं आमच्या ताब्यांत दिलं आहे. पण हें नसं-

तंच नाहीं तर लग्नाच्या वेळीं शपथा होऊन. बाकी त्या वेळच्या त्या शपथा आणि ती वचनं कळताहेत कुणाला? त्यांत नवरा नवरी लहान असली मग तर विचारायलाच नको! पण लहानपणच्या लग्नांत मोठी मौज असते नाहीं? नाहींतर आमचें हें दुसरें लग्न! लग्नाच्या वेळीं स्वारी केवढी आणि मी केवढी. पहिल्यांदा काय जे ते माझी चेष्टाच करी, तेव्हां मला कसं ओशाळल्या सारखं होई. पण, आतां त्याचं कांहीं वाटत नाहीं. स्वारी कशी अगदीं अर्ध्या वचनांत! नाहीं तरी जिकडे तिकडे हें असेंच आहे. दुसरी बायको ह्मणजे काय? एक अमोलिक चीज! आणि किती किती तरी तिच्यावर प्रेम! अगदी मन दुखवून बोलायचं नाहीं. हें मलातर कसं चांगलं अनुभवाला आलं आहे अगदीं. पण कां नये होऊं असं? उमललेल्या फुलाचा आस्वाद घेत असतां, तें जर चुरडून गेलं; तर दुसरं कोणतं सुद्धा नये ह्मणून नको कां जपायला? आणि त्यांतून नवेपणा! मग तो कोणाला नाहीं प्रिय! बरं तिकडून तर माझ्या गुणाची आणि रूपाची किती किती तरी वाखाणणी होते. कां मी अशी रंभा आहे? कां आहे तरी काय? हो खरच, रंभाच कशाला हवी! मेलं हें तारुण्य आलं किनई ह्मणजे जी ती चांगलीच दिसूं लागते. त्यांत रूपानं चांगली असल्यावर मग तर पहायलाच नको (जवळ असलेला आरसा घेऊन व त्यांत पाहून) माझं रूपही कांहीं वाईट आहे कां? जें तें चांगली चांगलीच नाहींका म्हणत. पण मला असा गर्व होणे चांगलं नाहीं छे, छे, नकोग बाई हा गर्व. लक्ष्मी, पार्वती ह्यांच्या सारख्यांचा गर्व जर शेवटास गेला नाहीं; मग मी तर काय यःकश्चित पामर. पण मेलं तें कोणतं बरे गाणं? किती किती तरी दिवस झाले आहेत तें ह्मणून; पण मी तें विसरायची नाहींच. मी तें लहानपणीं पाठ केलेलं आहे लहानपणी पाठ केलेलं कधीं विसरत नाहीं ह्मणतात. (आठवल्या सारखें करून) हो, हो, आठवलं. हो, हेंच तें.

**गाणें.**

लक्ष्मी सावित्री गौरी कुणि एके दिवशीं। गर्व करूनी ह्मणती चौथी नाहीं आह्मा सरशीं॥ त्रिभुवन स्वामिनी। आह्मी तिघीजणी॥ तेव्हां तेथें अकस्मात आले नारद मुनी। विनवूनी अति आदरें। [illegible] त्या

लागोनी ॥ आह्मा सारीखी । कोण असे त्रैलोकीं ॥ चाल ॥ नारद वदे त्या प्रती, त्या प्रती । अनुसुया म्हा साध्वि ती; साध्वि ती । आहे चित्रकुट पर्वती, पर्वती ॥ चाल ॥ कुणी गर्व नये कीं करूं । अभिमान नये हा धरूं । तुह्मा मी विनवी, विनवी कर जोडून, गर्व सोडून, सुखानें नांदा ॥ चाल ॥ इतुके वदुनी, हो वदुनी । नारद गेले स्वस्थानीं ॥ तळमळती तिघी निज भुवनीं । खिन्न त्या स्वमनीं ॥ चाल ॥ आले तशांत त्रयही देव । जाणिला तयांचा भाव । केले बहुत परी उपाव । तरी नकळे तयांची माव ॥ चाल ॥ मग ह्मणे उमा, आणि रमा, आपुल्या पातिला । जळो आमुचें जिणें, हें लाजिरवाणें, मान न उरला ॥ चाल ॥ त्या अत्रिऋषिच्या पत्निगृहीं तुम्ही त्वरें । दास्यत्व कराया जावा आम्हा करें । नातरी हरावें सत्व तिचें तें बरे । तरी आह्मी तुमच्या तुम्ही आमुचे खरे ॥ चाल ॥ हें तुम्ही जरी नच करा, नच करा ॥ जीवीत आशा नच धरा, नच धरा ॥ चाल ॥ आमुची, आण कीं साची, ह्याच पायाची । देऊं कीं प्राणा, देऊं कीं प्राणा । निश्चये जाणा ॥ चाल ॥ ते ह्मणती तया लागून, ते ह्मणती तया लागून । वृथा अभिमान । नका तुह्मी धरूं ॥ भस्म करील ता आह्मा ॥ अनुसया सतीचा अगाध आहे महिमा ॥

( राघोबादादा प्रवेश करितात आनंदीबाई लाजून उभी राहते. )

राघो०—हं चालूंदे तें पुढें. बंद का ! नको, नको आतां उभे सहाचला. पुरे आहे ही मर्यादा. बैस खालीं बैस.

आनं०—आपण बसला कीं, बसलेच मी.

राघो०—बरें आहे. हा घे मी बसलों ( बसतो ) आतां तर बसशील ना !

( आनंदीबाई अंतरावर बसते )

राघो०—अशी दूर काय ह्मणून ! आतां येथें दुसरे कोणी नाहीं कांहीं, ह्मणून इतकी लज्जा !

आनं०—असं आपल्या कडून बोलणं झालं ह्मणजे बरं ही ध्या आले जवळ. ( जवळ जाऊन बसतें. )

राघो०—अहा, आतां माझ्या सारखा धन्य कोण आहे. ( तिच्या. हनुवटीस हात लावून ) ईश्वरानें मला हे अमोल रत्न देऊन सगळ्या पृथ्वी वरील सुखें एके ठिकाणीं आणली आहेत. बरे आहे. मचाचा तो 'अगाध महिमा' कोणाचा ह्मणा ! ह्मणा पाहू एकदां.

आनं०—पुरे झालं मेलं. आतां त्याचं काय करायचं आहे.

राघो०—समजलो, समजलो. एकून तो अगाध महिमा आपलाच.

आनं०—इश्श ! माझा तो काय अगाध महिना.

राघो०—कां, नाहीं का; हें आपलें तारूण्य आणि ते डोळे, छे, छे; त्या कटाक्षाकडे मलातर नाहींच पाहवत बुवा.

आनं०—पुरे मेलं. मी हे कां ह्मणत होते. मी तें लक्ष्मी, पार्वती ह्यांना रूपाचा गर्व झाला होता, त्याचं गाणं ह्मणत होते हो.

राघो०—असें असें मग तूही तशी गर्व होण्यासारखी आहेसच.

आ०—हो, कुणी खरंच म्हणेल कांहीं. मला कां समजत नाहीं कीं, आपलं मला गोड वाटावं ह्मणून ह्मणायचं हें

रा०—छे, छे; असें नाहीं, मी खरेच ह्मणतो हे. पुरुषांचें ह्मणणें, ह्मणजे स्त्रियांना असेंच वाटायचें नाहीं? मगतें त्यांचें कितीहि अंतःकरणा पासून असो आणि कितीहि खरें असो.

आ०—मी हें आपल्यालाच ह्मणतें असें नाहीं

रा०—तर मग !

आ०—बायका इतक्या वाखाणण्या सारख्या नसल्या तरी पुष्कळ पुरुषांच्या तोंडातून त्यांच वर्णन केलेलं ऐकतें. मग नाहींकां ते गोड वाटावं म्हणून आणि वेळे पुरतं.

रा०—असें तुझाला वाटत असेल पण खरेच पाहिलें तर, अशा प्रेमाच्या वेळीं त्यांना त्या चांगल्याच दिसतात. काय असेल तें असो.

आ०—पण करायचंय काय त्याचं आतां. आहे, सगळं आपलं प्रेम मजवर आहे. मी कुठें नाहीं ह्मणतो.

रा०—मग हा सगळा विनोद तर ! बायकांनीं एकांत प्रसंगीं असा विनोद करून पुरुषांचा अंत पाहायचा अशी रीतच पडून गेली आहे नाहीं.

आ०—आणि पुरुषांनीं बायकांचा उगीच चेष्टा करून त्यांना संतापायला लावायचं असंही ठरलेलेंच आहे नाहीं.

रा०—अगे तो संताप पण आनंदाचा संताप. आम्ही असं करून हें सगळं खोटं म्हटलं कीं, मग किती बर आनंद होतो.

आ०—खरंच, आपण कधीं आनंदानं पुष्कळ पुष्कळ बोलत बसलों असं तर नाहींच झालं. नेहमीं नेहमीं आपल्या त्या लढाया.

रा०—(आपल्याशीं) काय, ही तर आनंदमेरूवर चढली आहे. अतां जर पानपतकडे जावयाची हकीगत हिला सांगितली तर हिचा हा आनंदमेरू सगळाच ढासळणार आहे. पण हें इतक्यांत सांगूच नये. सांगत सांगत सांगावें ह्मणजे बरें. (उघड) राज्य मिळवायचें ह्मणजे तें घरीं बसून कां मिळणार? कां दरबारांत लांब लांब बाता ठोकून मिळणार? त्याला लढाया ह्या केल्याच पाहिजेत.

आ०—मी ह्मणतें, पण करायचंय काय त्या राज्याचं. मनुष्य आनंदांत आणि समाधानांत असलं ह्मणजेच कायते सुख. लढाईवर जावून जीव धोक्यांत घालायचा आणि दुसऱ्यानांही काळजी करायला लावायचं हें कुठलं सुख. राजाला सुख नसतं ह्मणतात तें खरं आहे.

रा०—राजाचें सुख! आणि कोण त्याची बरोबरी करील. राजानें आपल्या प्रजेचें नीतीनें पालन केलें आणि प्रजेनें त्याला अंतःकरणापासून चांगलें ह्मटलेलें ऐकिलें ह्मणजे त्याच्या इहलोकिच्या सुखाला तर सीमाच नाहीं. पण स्वर्ग लोकींहीं त्याला अक्षय शांती मिळते.

आ०—असेल राजाला हें सुख, पण आपल्याला काय त्याचं.

रा०—हा वेडे. नाना आणि मी भिन्न आहोंत असें कां तूं समजतेस. जें नानांचें सुख, तेंच माझें सुख. आणि नानांचें सुख तरी काय आमच्या वरच अवलंबून. आह्मी लढायी जिंकावी स्वधर्माचें रक्षण करावें. आणि परक्यांचें वर्चस्व आह्मावर चालूं देऊं नये तेव्हांच नानांना प्रजा चांगलें म्हणणार. मग प्रथम आह्माला आनंद आणि सुख कीं [illegible] लढाईंत वीरांना जय मिळाला ह्मणजे त्यांना जो आनंद होतो त्याचा अनुभव त्यांचा त्यांनांच कळणार. त्यांच्या त्या सुखाला स्वर्गसुखाची सरसुद्धां येणार नाहीं

आ०---आपल्याला होत असेल तसा आनंद, पण आम्हांला नाहींना होत तो. लढाईवर गेले म्हणजे काय असेल, कसं असेल, हेंच म्हणून रात्रंदिवस कुंठायचें झालं. आमचं सगळं सुख, समाधान, आनंद देवानें आपणाकडे ठेविलं आहे, आपण दिलंत तर मिळणार आम्हाला सुख.

रा०---मग आम्ही तरी कां नाहीं देणार सुख. म्हणशील ते तयार आहे, हा करायला.

आ०---मग कुठें तर मी लढाईवर जाऊं नये म्हणून म्हटल्यावर ऐकणं होतं

रा०---आम्ही लढाईला जाऊं नये ह्यांतचं तुमचं समाधान आहे काय? बरें, आम्ही लढाईला गेलों नाहीं; तर होईल तुमच्या मनासारखें. पण मग आम्हाला वाटेल कां ह्यांत समाधान?

आ०---मेलं नाहीं वाटणार, म्हणून:--

रा०---म्हणून कशाला आम्हाला समाधान नसलेलं आपल्याला पाहिजे आहे एकून. आतांच ह्या पानपतच्या लढाईत अपजय होऊन हें आमचें तोंड काळें ठिक्कर झालं आहे हेंही चांगलेंच म्हणायचें.

आ०---छे, छें, असं नाहीं घडणार मज कडून. असं समजणारी बायको राक्षसीच समजायची. जें आपल्याला सुख तें आम्हाला सुख आणि जें आपल्याला दुःख तें आम्हाला दुःख.

रा०---मी तरी तेंच म्हणतो. आणि स्त्रियांचा शास्त्रोक्त खरा धर्म तोच आहे पुरुषांनींही स्त्रियांना आनंदांत ठेवणें हें कर्तव्य कर्म आहे. जर पुरुष किंवा स्त्रिया निष्कारण एकमेकांच्या असमाधानाला कारण होतील, तर मात्र तो त्यांचा धर्म नव्हे.

आ०---बरें, पण आपणाकडून जेवढं सुख व समाधान मला देववेल तेवढं देणं तर आपला धर्म आहेना?

रा०---आणि ज्यापासून आम्हाला समाधान आहे त्यांत आपल्याकाही तें असलें पाहिजेना?

आ०---नाहीं कोण म्हणेल त्याला.

रा०---तर मग मोठ्या समाधानाची एक गोष्ट सांगणार आहे मी तुला.

आ०—सांगा, सांगा; काय आहे ते.

रा०—छे, पण नकोच.

आ०—मेलं मग म्हणायचं कशाला सांगतो म्हणून! कां कुणी मागं लागलं होतं सांगा सांगा म्हणून.

रा०—सांगतों, पण नीट एकून घेशील तर.

आ०—ऐकून न घ्यायला काय झालं.

रा०—हें पहा, ह्या पानपतच्या लढाईंत आपले भाऊसाहेब व विश्वासराव आणि पुष्कळ सरदार त्या गिलच्यांनीं नाहींसे केले व फार विनाश केला. ह्याचा सूड उगवायचा मग आहेना समाधान.

आ०—तरी मला वाटलंच कीं, लौकर सांगायचा होईना तेव्हां कांहीं तरी असं असेल म्हणून. काय मेलं तें समाधान.

रा०—तूं ऐकते म्हणून म्हणालीसना आणि माझें समाधान तें तुझें समाधान असें कबूल करतेसना.

आ०—ऐकलं आणि म्हटलं पुरे तें.

रा०—ह्या वेळेला असें केलें तर मग आपलें सगळें सुख, सगळें वैभव नाहींसें होणार, मग समाधान कोठचें. आणि तेंही झालें तरी भाऊ सारखा बंधु गेल्याचा सूड घेतल्या खेरीज मला तर सुख नाहींच नाहीं.

आ०—असं, असं; एकुन आपल्या बोलण्यांत निश्चय नाहीं. सदाशिव भाउजींचं आन् आपलं लढाईवर जाण्या संबंधीं भांडण झालं. त्यावेळीं म्हणणं झालं कीं, 'मी त्या भाऊचं नांवही घेणार नाहीं, आणि अतःपर त्याला मदतही करणार नाहीं, तो जातो आहे लढायाला तर करूं दे त्यालाच लढाया. मी आतां म्हणून लढाईला जाणार नाहीं.' आणि आतां हें असं बोलणं. मग मला प्रथमच कशाला सांगायचं होतं कीं 'आतां पासून तूंही भाऊशी मजप्रमाणेच वाग' म्हणून.

रा०—असें बोललों तरी नको का जायला लढाईला. आणि आतां मी भाऊला कोठें मदत करायला जात आहे. भाऊ तर गेलाच, पण पेशव्यांच्या अपयशाचा डंका वाजतो आहेना. त्याबद्दल लोक कोणाला नावें ठेवितील.

व्यर्थ. पुरुष निर्दय, कार्यसाधु, आणि स्त्रियांना फसविणारे ह्मणतात तेंच खरं. आपण तरी त्या बाहेर कुठचे असाल ? फार चांगलं जाणार तर जा. पण मी जर नांवाची—

रा०—तूं तर आहेसच नांवाची. तुला बिन नांवाची कोण ह्मण-णार. पण हें सगळें रागांतच कां ?

आ०—रागाचें असो. नाहींतर लोभाचें असो. जायला सांगितलं खरं.

रा०—तसें कां होईना, पण प्रेमानें जायाला सांग पाहूं बरं एकदां.

आ०—नको आहे आतां विचारायला. जा ह्मणून सांगितलं आहेन आतां, तेंच प्रेमाचं समजा ह्मणजे झालं.

रा०—खरं आहेना हें.

आ०—खरं आहे, अगदीं खरं आहे; झालं आतां, कां आणखी पाहिजे सांगायला ?

रा०—बरं आहे जातो तर आतां. ( पडद्यांत दादासाहेब, दादासा-हेब ह्मणून हाक मारितात. ) हे पहा, माझे रणशूर विर मला हाक मारीत आहेत. जातो तर, मात्र हा रागसोडा. ( जवळ जाऊन हनुवटी धरितो. )

आ०—पुरे मेलं मला, नाहीं आवडत हें. आपल्याला जायचंच मग कशाला माझ्याशीं बोलायचं.

रा०—जायचें तर खरेंच, पण तूं सांगितलें पाहिजेसना. सांग बरं एकदां जा ह्मणून. माझे वीर बहादर माझी वाट पहात आहेत.

आ०—सांगितलेंना जा ह्मणून.

रा०—बरें आहे तर येतो. तूं कांहीं काळजी करूं नकोस. स-र्वांना सुरक्षित ठेवणार परमेश्वर समर्थ आहे. आपला सगळा भार त्यावर असला पाहिजे. ( जातो )

आ०—गेलेसना. मी ह्मणत होतें कीं, स्वारी माझ्या अर्ध्या वचनांत. पण सगळं व्यर्थ. ( थोडे थांबून ) बरं आहे. ह्मणावं. स्त्रियांनीं पुरुषांना मोह कसा घालावा हें मी. जर जाणत असेन, तर

आता आस्यावर सांगितलेलं ऐकविनच ऐकवीन तरच नांवाची आनंदी. मात्र जगदंबेनं सुरक्षित आणावं त्यांना; येवढंच तिजपाशीं मागत आहे मी.

( पडदा पडतो. )

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

( सुगुणा गिलच्यांच्या अटकेंत आहे असा प्रवेश होतो. )

सुगुणाः—परमेश्वरा, काय ह्या अभागीवर हा प्रसंग आणलास! पण परमेश्वराकडे तरी काय ह्याचा दोष? मी होऊनच हें संकट आपल्यावर आणलं. तिकडनं मला चांगलं सांगणं होत होतं कीं, लढाईवर जातांना स्त्रियांना बरोबर नेणं चांगलं नाहीं. पण माझाच हट्ट, कीं न्या मला बरोबर ह्मणून. मला तरी काय माहित कीं असा प्रसंग येईल हें. बरं आतां करायचं काय सापडलें खरी मी ह्या दुष्टाच्या तावडींत! आतां काय होईल तें खरं. मेला तो बादशहा तरी किती अधम आहे. मजवर पापदृष्टी ठेवून माझ्याशीं मोठ्या प्रेमानं बोलायला येतो. वरून बोलण्यांत काय पण साखर पेरतो; जसं कांहीं कोणी ह्मणेल कीं, ही अबला स्त्री ह्या संकटांत पडली; हें पाहून त्याला फार वाईट वाटतं आहे. पण मेल्याचं तें कृष्णकारस्थान समजण्याइतकी मी दुध-खुळी नाहीं. ( थोडा वेळ थांबून ) नाहीं, मी पुष्कळ शहाणी आहे. पण आतां काय करणार; ह्या मांगांच्या हातांत सापडलें आहेना! आतां माझी लाज राखणं देवाकडं आहे. श्रीकृष्णानं द्रौपदीची विटंबना होऊं दिली नाहीं असं मी कथेंतून ऐकलं आहे. तसंच माझ्या ह्यावेळींही तो गोपाळ धांव घेईल तर ह्या नीचाच्या हातूनही माझी सुटका होईल. ( किंचित् थांबून ) पण काय करायची आहे माझी सुटका होऊन! माझ्या प्रियकराची जर कांहीं भलती सलतीच गती झाली असेल तर माझ्या ह्या जीवीताचा काय उपयोग? मला इथंच मरण आलेलं बरं! पण नको, देवा तूं माझी येथून सुटका कर. ह्मणजे मी माझें जीवीत-

नाथ इहलोकीं नसलेच तर त्यांच्याबरोबर सहगमन करीन आणि जर ते जिवंत असतील तर सगळं त्रिभुवन पायांनीं तुडवून त्यांची भेट घेईन व कधींच वियोग न व्हावा ह्मणून त्यांनां घट्ट मिठी मारून बसेन. ( कोणी आल्याचा भास होतो. ) मेलं कोणी आलं वाटतं. ( निरखून पाहून ) हो, आलाच तो मेला चांडाळ अहंमदशहा.

( अहंमदशहा प्रवेश करून )

**अहंमदशहाः**—हे स्त्रिये, तुला एक दुःखाची हकीगत सांगण्याचा प्रसंग मजवर आला आहे.

**सुगुणाः**—आतां सुखाची वार्ताही माझ्या कानीं येणार नाहीं हें मला माहितच आहे. दुःखाचे पर्वतच मजवर कोसळणार आहेत. तेव्हां मला तें सहन करण्यास तयार असलेंच पाहिजे.

**अहंमदशहाः**—हे तारूण्यवती व रूपवती अबले, मला तुझें हें नवयौवन आणि सौंदर्य पाहून, तसं दुःख सोसण्यास तूं कशी तयार होशील अशी चिंता पडली आहे.

**सुगुणाः**—मजवर आकाश कोसळलं, धरणीमातेनं मला गिळण्याकरितां आक्राळविक्राळ आ पसरला, दुष्ट पिशाच्चानीं मजपुढें येऊन घाटेल त्या चेष्टा केल्या किंवा याहूनही कोणतं एखादं संकट आलं, तर मी तें सुद्धां सहन करीन.

**अहंमदशहाः**—हे सुंदरी, तूं असं जरी ह्मणत आहेस, तरी मी सांगेन ती तुझी झालेली हानी ऐकून तुला परमावधीचें दुःख होईल. आणि तूं किती तरी वेळ शोकाग्नींत होरपळत पडशील.

**सुगुणाः**—( आपल्याशींच ) मेलं, हा असं काय बरं ह्मणतो आहे. कांहीं तिकडच्या जिवाला तर बरं वाइट झालं नसेलना. असं असेल तर मग मज सारखी अभागी कोण आहे. पण संशय कशाला. विचारावच याला. ( उघड ) आपण ह्मणतां असं मजवर संकट तरी कोणतं आलं आहे !

**अहंमदशहाः**—काय सांगूं, तुझा पति आनंदरावपवार आमच्याकडे कैदी ह्मणून सांपडला होता पण त्याचीही इतर लोकांबरोबर न समजून मजकडून कत्तल झाली.

सुगुणाः—(दचकल्यासारखें करून) काय, ते आपल्याकडे बंदिवान होते आणि त्यांचं शीर उडवलं गेलं !

अहंमदशहाः—होय, होय.

सुगुणाः—हायरे दैवा, ( असें ह्मणून बेशुद्ध होते. )

अह०—हें काय झालें ही स्त्री तर माझ्या ह्या खोट्या भाषणानें बेशुद्ध झाली ( तिच्याकडे निरखून पाहून ) अहा, ही युवती किती रमणीय आहे. ही जर मला वश झाली तर मज सारखा आनंदी मीच. असो; ही आतां जरी आपल्या पतिनिधनवार्तेनें विव्हळ होऊन गेली आहे, तरी कांहीं वेळानें सावध होईल. आणि अशा स्थितींत ही मजजवळ राहिली तर खात्रीनें माझ्या वैभवाला भुलून मजवर अनुरक्त होईल. आतां आपण येथून जावें, व तिला सावध करण्यासाठीं तिच्या सेवेस दिलेल्या मराठे शिपायास पाठवून द्यावे. (असें ह्मणून जातो)

( अहमदशहा गेल्यावर थोड्या वेळानें सुगुणा सावध होऊन.)

सुगुणा—( इकडे तिकडे पाहून ) अं, मेला तो चांडाळ गेला वाटतं. ( दुःखानें ) अरे मेल्या, तिकडचा अंत करून मला मोठा मानभावीपणा दाखवून सांगायला येतोस काय कीं, मी न समजून त्यांच डोकं कापलं ' अरे मी इतकी वेडी नाहीं समजलास. का ब समजलं नाहीं? बा, तुला ते माझे प्राणनाथ आहेत असं ठाऊक असतं तर तूं केवढीं थांब्यावर व माझ्या वर दया करून त्यांची व माझी भेट करविली असतीस आणि आह्मांला सोडून दिलं असतंस ! मी कां तुझं मनोगत जाणत नाहीं? त्यांना इहलोकांतून नाहींसें करून मला अनाथ करायची आणि मग आपली दुष्ट वासना कोणत्या तरी युक्तीनें पूर्ण करायची हें.पण पक्कं लक्षांत ठेव कीं, ही सुगुणा तुझ्या दुष्ट वासनेच्या तृप्तीपूर्वीं तुझ्या पोटांत एखादी कट्यार भोसकून तुला यमाचे घरीं पाठवील.

( इतक्यांत एक मराठा शिपाई प्रवेश करितो त्यास पाहून सुगुणा स्तब्ध राहते. )

मराठा शि०—बाई साहेब, आतां दुःख करून काय होणं आहे. झालेल्या गोष्टीला इलाज नाहीं. खरोखरच आनंदराव पवाराबद्दल मला-ही फारच वाईट वाटत आहे. त्यांचें शूरत्व आपले बादशहाही फार

वर्णन करितात. पण तें होते बादशहाचे शत्रु म्हणुन तसं झालं. त्याला कोणाचा इलाज खरं पाहिलं तर बादशहा फारच दयाळू आहेत. त्यांना तुमच्याविषयीं फार दया येते.

**सुगुणा०**—बाबा, मजवर परमेश्वरानं एकदमच दया करून ठेविली आहे आतां बादशहाच्या दयेनं मला काय होणार आहे.

**म०शि०**—असं काय म्हणतां बाई साहेब. खरोखरच ते फार थोर मनाचे आहेत. आपण जर त्यांच्या म्हणण्या प्रमाणें वागला तर आपल्याला यत्किंचित देखील दुःख होणार नाहीं.

**सुगुणा०**— ( आपल्याशी ) तरी मला वाटलंच कीं हा बादशहाची फारशी स्तुती करितो तेव्हां पुढें शिष्टाईला सुरूवात होणार म्हणून. ( उघड ) बादशहाच्या मर्जी प्रमाणें वागायचं म्हणज तरी काय !

**म०शि०**— तेवढ्यांतच सगळं आहे. यापेक्षां उघड काय बोलायला पाहिजे.

**सुगुणा०**— ( त्वेषानें ) मेल्या, तू जातीचा अस्सल मराठा खास नाहीस. तूं मला चांगला बोध शिकवायला आला आहेस. तुझं म्हणणं काय कीं मी बादशाशीं रत होऊं ! अरे अधमा, तूं आपल्या आया बहिणींना असेंच सांगत आलास काय! आणि तूं आपल्या हातांनीं त्यांना बादशहाच्या महालांत नेवून पोचविल्यास काय! असंच जर खरं असेल तर तुला मराठा नव्हे नीच हिंदु देखील म्हणण्याला मला लाज वाटते. तूं असलं पातक असला नीचपणा पतकरून कोणतं हीत साधलंस. ह्या वीतभर पोटाची खळगी भरण्यापलीकडे ह्या तुझ्या नीचपणाचा उपयोग झाला नसेल. पण तुझा हा अधमपणा तुला शेवटीं रौरवनरकांत पोंचवील.

**म०शि०**—हें तर खरेंच पण प्रसंग आल्यावर काय करायचं ! प्राण ह्या सर्वांना प्रिय आहे.

**सु०**—नेभळ्या, प्राण सर्वांना प्रिय आहे काय ! माझ्यासारखी अबला देखील प्राणापेक्षां स्वधर्माभिमान, स्वजाति अभिमान आणि स्वदेशाभिमान आधिक समजते मग तूं तर पुरुष व तोही मराठा, मग तुला असें बोलवलें तरी कसं आणि करवलं तरी कसं. तुला ह्या निचाच्या लाथा बुक्या खाऊन आणि अपमान सोहून हें दास्यत्व करणं मोक्ष

Mr. V. M. Chandra
25-11-39
K.G.P



दायक आहे असं कां वाटतं ? तूं मराठ्यांच्या नांवाचा कीर्तिध्वज असं करून सर्व भूमंडळावर चांगला फडकावितोस.

म० शि०—बाईसाहेब, आपल्या भाषणानें माझ्या हृदयांत चांगला प्रकाश पडला. मी आतापर्यंत ह्या यवनांची कामगिरी जितक्या इमानानें केली तिच्याहीपेक्षां अधिक इमानानें आपली सेवा करीन, पण येथून आपण आपली सुटका करून घेण्याचा उपाय योजावा. कारण आनंदराव पवार मारले गेले नाहींत ते बादशहाच्या प्रतिबंधांतून सुटून गेले आहेत.

सु०—काय ते जिवंत आहेत ! आणि बादशहाच्या अटकेंतून सुटून गेले आहेत !

म० शि०—होय. अमदशहानें आपल्याला जें सांगितलं तें सर्व खोटं सांगितलं.

सु०—( आपल्याशीं ) परमेश्वरा, तूं मला किती तरी धन्य केलेंस. माझे प्राणनाथ आतां मला केव्हां भेटतील असं झालं आहे. ( उघड ) शिपाई बोवा, आपण ह्मणतां कीं, ते अहमदशहाच्या हांतून सुटून गेले आहेत; पण कुणीकडे गेले आहेत, तें कांहीं समजलं आहे काय हीं तुह्माला ?

म० शि०—ते आतां दादासाहेब पेशवे पानिपतच्या लढाईत झालेल्या अपजयाबद्दल गिलच्यांचा सूड घेण्याकरितां येत आहेत त्यांच्यांत जाऊन मिळले असतील.

सु०—काय, दादासाहेब गिलच्यांचा सूड घेण्याकरितां येत आहेत?

म० शि०—होय.

सु०—आणि तुह्मांला हें कसं समजलं ?

म० शि०—कालच दरबारांत अशाविषयीं बोलणं निघालं होतं.

सु०—( आपल्याशीं ) देवा, तूं मला एकेक आनंदाचीच बातमी ऐकवीत आहेस. पण या सगळ्या आनंदापेक्षां माझ्या प्रियकराची भेट करवून मला आनंदसागरांत केव्हां बुडवशील. ( थोडा वेळ विचार करून ) कसंही होईल पण मला इथून सुटून जाण्याचा प्रयत्न केला

पाहिजे. [illegible] ठेवा, तुम्ही मला मघाच्या आपल्या वचनां-प्रमाणं खरो[illegible]ना ?

म०शि०—[illegible] काही इतकं अंतर होणार नाहीं.

सु०—बरं [illegible]ं मागणं आहे तुमच्याजवळ. तुह्मांला मी आपल्या भाव[illegible] आणि तुह्मीही मला आपल्या बहिणीप्रमाणं वागवा [illegible] संरक्षण करा.

म०शि०—त्याविष[illegible] काळजी करावयास नको. आपण जेव्हां जेव्हां जसज[illegible] तेव्हां तें तें करीन येवढंच नव्हे तर मी आपल्याबरोबर [illegible]ईन.

सु०—ठिक आहे, मी सां[illegible]बरदारी ठेवा ह्मणजे झालें.

( इतक्यांत पहारा बदलल्यामुळें दुसरा [illegible] प्रवेश करितो. )

मु०शि०—( मराठे शिपायास ) [illegible] आपल्या वेळेवर आलों आहे. तेंव्हां तूंही माझा पहारा सं[illegible].

म०शि०—मी पाहिजे तर मी ह्या पूर्वी[illegible]. ( आपल्याशी ) हो लवकर येऊन ह्या बाईला तितकं[illegible] करतां येईल. ( उघड ) बरं आहे तर, मी जातो आता [illegible] जातो)

मु०शि०—कां बाई, अशा उदासीन होऊन [illegible]आहां, झालेल्या गोष्टीपुढें काय करायचं; पण त्यांतल्या त्यां[illegible]पल्या मनाला समाधान मानून घेतलं पाहिजे.

सु०—समाधान तर असलंच पाहिजे. कारण ई[illegible]माणं सगळं होत असतं तेव्हां त्याला कोणी दोष लावावा[illegible]

मु०शि०—मी तरी तंच ह्मणतों. पण असा वि[illegible] आहे कोण ?

सु०—कोण ह्मणजे, ज्यांच्यावर तसा प्रसंग येत[illegible]

( इतक्यांत कोणी आल्याचा भास होऊन शिपाई बाजूस [illegible] विचार केल्यासारखे करून सचिंत बसते. )

मु०शि०—( इकडे तिकडे पाहून ) अं कोण[illegible] मला कोणी फसविल्यासारखं केलं कीं काय ? ( पुन[illegible]

कोणी आल्यामुळें ) हं, हं; हे रूपखान पठाण आले आहेत. स्वारी कां बरें आली असावी ! कांहीं समजत नाहीं.

रूपखान०—( मुसलमान शिपायास )कां लालखां ठीक आहेना ? बादशहाची मर्जी तर आपल्यावर बहुत खुष आहे.

लालखा०—मर्जी नुसती खुष होत नसते. त्यासाठीं तशींच कामें करावी लागतात.

रूपखान०—मग आतांही आपल्याला बादशहाची अशीच नाजुक कामगिरी आली असेल.

लाल०—कसली बोवा ?

रूपखान०—वा, आणि वर हेही आहेच कां. आह्माला हो काय, नसेल तुमची मर्जी तर नका सांगूं बापडे.

लाल०—हें पहा रूपखान, मला असं संदिग्ध बोलून कांहीं समजत नाहीं. जें काय असेल तें स्पष्ट बोला पाहू.

रूपखान०—असं काय. बरं तर तसं का होईना. आपण हल्लीं काय करता आहां.

लाल०—काय ह्मणजे, मी तुझ्याशी बोलत आहे.

रूप०—तसं नव्हे हो. आपल्याला हल्लीं बादशहानं काय काम सांगितलं आहे.

लाल०—ह्या इथं पहारा करण्याचें काम सांगितलं आहे.

रूप—पण तो कोणावर.

लाल०—कोणावर हें काय विचारतोस आनंदराव पवाराच्या बायकोवर.

रूप०—मग ह्याच संबंधीं दुसरं कांहीं काम बादशहानं नाहीं कां सांगितलं आपल्याला.

लाल०—छे, कांहीं नाहीं. आणि मी ह्मणतो कीं यासिवाय दुसरं आणखी काय काम असणार आहे बादशहाचं.

रूप०—मग नाहीं तर दुसरं यासंबंधानं बादशहाचं कांहीं काम.

लाल०—नाहीं.

रूप०—( आपल्याशीं ) वा, हा एक शुभशकुनच आहे ह्मणायचा-

चा. मला वाटलं होतं कीं. बादशहाची मर्जी जर तिजवर बसली असती तर आपल्या इच्छेचा कांहीं उपयोग नाहीं. पण आतां तसं कांहीं नाहीं. ( उघड ) बरं मग लालखान, तुह्मी माझं एक काम कराल का ?

लाल०—हो, हो; न करायला काय झालं.

रूप०—मग दे तर वचन.

लाल०—वचन, वचन आधीं कसं बरं देता येईल. मला आपलं काम समजूं द्या आणि नंतर मग वचन देतों.

रूप०—हे पहा, ज्या गोष्टींत माझं सुख आहे, तुझा फायदा आहे व बादशहाचा त्यापासून रोष होणार नाहीं; असं असल्यावर मग वचन देण्याला काय हरकत आहे.

लाल—ठीक आहे तसं असेल तर हें घ्या माझें वचन.

रूप—माझं काम ह्मटलं तर हेंच कीं, आपल्या अटकेंत असलेल्या आनंदराव पवाराच्या बायकोची भेट मला घेऊं द्यावयाची. काम काय आहे हें एवढ्यावरून तुझ्या लक्षांत आलें असेलच. एवढी कामगिरी तूं केलीस तर तुला योग्य बक्षीस देईन. ह्यांत तुझा फायदा आहे, माझं काम होईल आणि बादशहा ह्या संबंधानं आपल्याला कांहीं ह्मणतील अशांतली गोष्ट नाहीं.

लाल०—हो, हो; कांहीं हरकत नाहीं. पण तूं मला बक्षीस काय देणार ?

रूप०—बक्षीस ! ( गळ्यांतील मोत्याचें पेंडें काढून ) हें घे बक्षीस आधींच. आतां तर हरकत नाहीं

लाल०—( पेंडें हातांत घेऊन ) बरे तर. तुह्मी खुशाल तिची भेट घ्या. मी पाहिजे तर अमळ बाजूला जातो.(असें ह्मणून बाजूला जातो. )

रूप०—( पुढें येऊन ) अहो पैसा काय करणार नाहीं. मोठ्या मोठ्या अभेद्य दुर्गांतून कोणाला पळवून नाईल ! मी मी ह्मणविणाऱ्या शूर वीरांना अहंमन्यतेपासून भ्रष्टवील ! आपल्या दाराभगोनींकडून आपल्याच हातानें आतिनिंद्य असें व्यभिचारकर्म करवील ! एवढेंच नव्हे तर, आपला जो पवित्र स्वधर्म तो ही झुगारून देववील व आपल्या स्वदे-

शांची, स्वजातिबांधवांची आणि आपल्या कुळांची राखरांगोळी करवील ! असो; येथवर तर सर्व ठीक झालें, आतां प्रश्न काय तो ह्या सुगुणेचा. तिही ह्मणजे पैशाला भुलणार नाहीं अशांतली गोष्ट नाहीं. अहो, सुख आणि संपत्ति कोणाला नको आहे. बरें आतां आपण पुढें होऊन करावाच किल्ला सर करण्याचा प्रयत्न. (असें ह्मणून सुगुणेजवळ येऊन तिच्याकडे तटस्थ वृत्तीनें पाहूं लागतो.)

सुगु०—( त्याच्याकडे पाहून ) अं, हा काय चमत्कार, इतक्यांत एक मुसलमान शिपाई पहाऱ्यावर होता तो एकदम नाहींसा होऊन हा कोण येथें आला. आणि तो आंत काय ह्मणून.

रूप०—आंत येण्याचें कारण असल्यावांचून कां कोणी येणार आहे हे पहा, माझें एक आपल्याकडे काम आहे. आणि आपण तें कराल अशी मला खात्री आहे.

सुगु०—बाबा, मजकडेरे तुझें असें कोणतें काम आहे कीं, मी तें करूं शकेन. मला तर वाटतें कीं, माझ्या हातून अशा स्थितींत तुझें कोणतेंही काम मजकडून होण्याची आशा नाहीं.

रूप०—आपण मनांतच आणलें तर आशा स्थितींत ही तुह्मी माझें काम करूं शकाल. मात्र आपल्या मनांत पाहिजे.

सुगु०—( त्याच्या ह्या बोलण्याचा भावार्थ समजून आपल्याशीं ) मेलें इथें शुद्ध कसयांचा बाजार आहे. मेलेल्या पशूला तोडण्यासाठीं जशीं गिधाडें टपून बसतात तसेंच हें एकाहून एक महाअधम आमच्या सारख्यांचं पातिव्रत्य भ्रष्ट करण्याकरितां जसें टपूनच बसले आहेत. इतक्यांत तो मूर्ख अहंमदशहा गेला नाहीं, तो हा मूर्ख मजकडे आला आहे. त्यांना असं वाटतं कीं, मराठ्यांच्या बायका ह्मणजे काय कीं, आमची संपत्ति आणि आमचं वैभव पाहून आह्मांवर तेव्हांच भुलून जातील पण त्यांना काय माहित कीं, हिंदूंच्या स्त्रिया ऐहिक सुखापेक्षां परलौकिक सुखच अधिक समजतात हें. बरं असो; आपण आतां हा आणखी काय काय म्हणतो तें तरी पाहूं. ( उघड ) बरं माझ्या मनांत आलं तर मग होईल. कां तुझें काम ?

रूप०—यांत काय संशय.

सुगु०—तसं झालं ह्मणजे बरं होईल. माझा स्वभाव असा आहे कीं, कोणाचंही काम आपल्याकडून होण्यासारखं असलं तर करावं; कोणी संकटांत असेल तर त्याला मदत करावी आणि--

रूप०—नको, नको; अधिक सांगायला. आपलं थोर मन येवढ्यावरूनच नव्हे, तर आपल्या नुसत्या बोलण्या चालण्यावरून आणि पहाण्यावरून समजतं आहे.

सु०—( आपल्याशीं ) वा, हा तर बराच माझी स्तुति करायला लागला.बरं ठीक आहे.आतां ह्याला चांगला फसवून आपण येथून निघून जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. (अंमळ विचार करून ) हो, हो; ठीक हीच युक्ति योजावी. ( उघड ) आपलं काम काय आहे तें मी समजलें आणि मी तें करीन; पण मी सांगेन त्या त्या माझ्या ह्मणण्यांप्रमाणें जर आपण वागण्याचं कबूल कराल तर. नाहीं तर मी आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागावं, आणि आपण.–

रू०—छे, छे; भलतीच शंका. आपल्या ह्मणण्याबाहेर मी यत्किंचितही जाणार नाहीं. पाहिजे तर त्याबद्दल मी आपल्या कुराणाची शपथ घेतों.

सु०—बरं तर आपण थोडसं मद्य मजसाठीं आणावं.

रू०—एवढंच. आणि तें मला आणायला कशाला जायला हवं. ( खिशांतील बाटली काढून ) हं, ही घ्या बाटली. (असें ह्मणून सुगुणेपुढें बाटली ठेवितो. सुगुणा त्या बाटलींतील बरेंच मद्य एका पेल्यांत घेऊन, तो रूपखापुढें ठेवून. )

सु०—हं हें घ्या आपण.

रू०—नाहीं, नाहीं; आपण घ्यावें पहिल्यानें.

सु०—असं कसें होईल. आपणच पहिल्यानें घेतलं पाहिजे. आपण घेतल्यानंतर मी घेईन.

रू०—बरं आहे, घेतों मी. ( असें ह्मणून रूपखा मद्याचा प्याला पितो. सुगुणा त्यांत आणखी मद्य घालून. )

सु०—आणखी घ्यावें थोडें.

रू०—नको, नको; आतां आपल्याला राहूं द्या तेवढें.

सु०( बाटली पुढें करून ) ( हें राहिलेलें सर्व मी घेतें आपण तवढ्याचा स्विकार करावा. ( रूपखा तो पेला पितो व सुगुणाही बाटलींतील मद्य प्याल्यासारखें करून तें सर्व सांडून देतें.

रू०—अहा, किती मधूर हें मद्य, आणि किती रूपवान व सद्गुणी ही युवती, आतां मला ह्यापुढें स्वर्ग लोकींचें सुख आणि अमृतही तुच्छ आहेत. ( असें ह्मणून तो सुगुणेजवळ जाऊं लागतो. )

सु०—हं, हं; खबरदार जवळ याल तर. अजून माझ्या म्हणण्याप्रमाणं सगळ्या गोष्टी झालेल्या नाहींत.

रू०—आतां उशीर कां बरं. आपलं जें जें कांहीं म्हणणं असले तें सर्व मला सांगावं. ह्मणजे मी त्याप्रमाणें तेव्हांच करून टाकतों.

सु०—ठीक आहे तर. ( असें म्हणून बाजूस जाऊन एक लुगडे आणितें व तें त्यापुढें करून ) आपण हें नेसावें आणि आपला पोषाख मला द्यावा. नंतर मग सर्व.

रू०—एवढंच. त्यांत काय अधिक आहे. आपल्या मर्जीप्रमाणें कां होईना. ( असें म्हणून रूपखा लुगडें नेसतो व आपल्या अंगावरील झगा, फेटा वगैरे सुगुणेंपुढें ठेवून ) हं हें घ्या आपल्याला.

सु०—( त्यानें दिलेला पोषाख चढवून व समशेर हातांत घेऊन ) आतां सर्व ठीक झालं. ( रूपखा तिला अशा स्थितींत पाहून आणि मद्याच्या योगानें झिंगत जाऊन )

रू०—महाराज आपण मोठे सरदार आहां, मजवर दया करा.

सु०—( आपल्याशीं ) आतां तुझ्यावर दया करण्याकारितांच तर एवढं केलेलं आहे. थोडयाच वेळांत तुझे मनोरथ पूर्ण होतील. ( उघड) माझं वचन पूर्ण केलं, आतां आपलं वचन कोणतं मी पाळायचं.

रू०—( मद्याचा अंमल अधीक झाल्यामुळें ) मा—माझं म—ह्मणणं आतां इ—इथं म—म—मला ( असें म्हणत ह्मणत तो जमिनीवर बेशुद्ध पडतो. )

सु०—अहारे दुष्टा, मजवर पापदृष्टी ठेवुन मजकडे येतोस काय ! अधमा, आतां लौकरच तुझं वचन पूर्ण करितें समजलास. ( असें म्हणून म्यानातून तलवार बाहेर काढून व त्याच्याजवळ जाऊन ) ही

घे तझी अर्धांगी आतां ही तुला कडकडून भेटेल आणि अक्षय असें मृत्युसुख देईल. ( असें म्हणून तलवार त्याचे मानेवर हाणू जाते. तों एकदम दुसरा विचार डोक्यांत आल्यानें ती मगें घेऊन ) नको, नको; ह्याला मारल्यापासून आपला फायदा नाहीं. याला माझ्या ह्या ठिकाणीं ठेवून, आपण ह्याच्या बदली बाहेर निघून जावें.

( असें म्हणून सुगुणा तेथून निघून जाते. ती गेल्यावर लालखान पुनः पहाऱ्यावर येऊन )

लाल०—( गळ्यांतील मोत्यांचें पेंडें हातांत घेऊन ) वा, आमच्या सारख्यांचं भाग्य केवढें थोर. अहो, हें येवढं मोत्यांचं पेंडं मिळवण्याला कित्येकांना किती तरी दिवस आपली शरीरें कष्टवावी लागत असतील आणि केव्हांकीं जिवावरील कामें करण्याचा प्रसंग आला असेल, पण माझं पहा, किती तरी थोड्या वेळांत हें काम झालं. खरोखर धनिक होण्याला लांचा सारखं दुसर सोपं आणि चांगलं साधन खचित नसेल. कांहीं लोक लांच खाणें फार वाईट समजतात, पण मी तर तें चांगलं समजतो. कारण एक तर दुसऱ्यावर उपकार आणि दुसरा आपलीहि चंगळ उडण्यासारखा फायदा. बरं लांच मागण्याला आपल्याला कोणाजवळ जावं लागतं असं नाहीं. ज्याला जरूर असते तोच होऊन आपल्याकडे येतो आणि आपण होऊनच तीं आमच्या पदरांत ओततो. आम्ही कांहीं बळानं त्याच्या जवळचं उपटीत नसतो. मग ह्यांत वाईट तें काय आहे. ( इतक्यांत कोणी आल्याचा भास होतो ) अं, कोणी आलें वाटतं. ( इकडे तिकडे पाहून ) हं, हे तर बादशहाच येत आहेत. बरं त्यांना इकडे येण्याचं कारण तरी काय असावं. ( थोडा विचार करून ) समजलों, ते मी हें पहाऱ्याचं काम कसं काय करितों ह्याचा तपास करण्याकरितां आले असतील.

( इतक्यांत बादशहा पुढें येतो त्याला पाहून लालखा मुजरा करितो. )

बादशहा०—कसंकाय लालखा सर्व ठीक आहेना.

लाल०—हुजूरच्या हुकुमाप्रमाणें सर्व यथास्थित आहे.

बाद०—लालखा, तुं अंमळ बाहेर उभा राहूनच पहाऱ्याचें काम कर. कारण मला त्या सुगुणेला कांहीं सांगायचं आहे.

आल०—ठिक आहे, हुजूरचा हुकूम होईल तसें. ( असें ह्मणून जाऊं लागतो. बादशहा आंत प्रवेश करितो. लालखा जातां जातां आपल्याशी ) बादशहा ह्या स्त्रीकडे एकांतांत बोलावयास जातात ह्यांतील हेतु काय असेल बरं? जर कां खाविंदच्या मनांत तिजविषयीं प्रेमबुद्धि असेल आणि माझें आतांच हें कृत्य त्यांना कळेल, तर मग मात्र फार वाईट परिणाम होईल. ( थोडा वेळ विचार करून ) पण आपण भलत्याच शंका मनांत कां आणाव्या. कारण, आपली ही गुप्त गोष्ट बाहेर कशी येणार ( असें ह्मणून बाजूस जातो. )

बाद०—( वेषांतर केलेल्या रूपखाजवळ येऊन व तो स्वस्थ निजलेला पाहून, ही सुगुणाच आहे अशा भावानें ) ही स्त्री तर अगदींच गाढ निद्रेंत आहे. आतां हिला कोणत्या बरें उपायानें जागी करावी? ( थोडा विचार करून ) दुसरें उपाय योजण्याचें कांहीं कारणच नाहीं एकदम तिला आलिंगन द्यावें आणि जागी करावी. पण जे तिच्यावर अशा रीतीनें मीं बलात्कार करूं गेलों तर ती मोठ्यानें ओरडण्याचा संभव आहे. ( पुन्हां थोडे थांबून ) बरें ती ओरडली ह्मणून काय झालें, मला असें करण्याला कोणाची भीति आहे कांहीं नाहीं. आतां हिला आलिंगन द्यावेंच. ( असें ह्मणून वेषांतर केलेल्या रूपखास बादशहा आलिंगन देतो. )

रू०—( थोडासा शुद्धीवर येऊन व उठून; सगुणाच जवळ आहे अशा हेतूनें बादशहास घट्ट मिठी मारून. ) आतां कां बरं उशीर. मनुष्याचा इतका अंत पाहाणें ह्यांत आपल्याला मोठें समाधान वाटतें ना! मला तर हा कामानळ पहा कसा पीडा देत आहे.

बाद०—( स्वगत ) काय चमत्कार आहे हा. मला वाटत होतें कीं, मी हिला एकदम दृढालिंगन दिलें तर ही मजवर फार रागावेल, पण माझी ती समजूत अगदींच चुकीची ठरली. आतां ही मजवर फारच अनरक्त झाल्यासारखी दिसत आहे, तेव्हां आपण विलंब करून उपयोग नाहीं आपली इच्छा परिपूर्ण करून घ्यावी. न जाणो कदाचित् हिचें मन पुन्हां बदललें तर? ( उघड ) माझी कठें ना आहे, मी तर आपल्याच रुकाराची वाट पहात आहे.

रूप०—एकूण माझीच इच्छा नसेल असें आपल्याला वाटत आहे तर ! काय सांगू, मी तर ह्या कामशराच्या योगानें फार विद्ध झालो आहे.

बाद०—( विद्ध झालो हे शब्द ऐकतांच दचकून स्वागत ) काय, हिचा शब्द पुरुषाप्रमाणें कां बरें येत आहे ? ( अंमळ विचार करून ) कदाचित् कोंकण प्रांतांत हिचा रहिवास झाला असल्यास असा शब्द चुकून आला असेल.

रूप०—आपण विचार कशाचा करितां? माझ्यानें आतां मुळीच धीर धरवत नाहीं. ( असें ह्मणून बादशहास आलिंगन देऊन त्याचें चुंबन घेऊं लागतो. व बादशहाही त्याचें चुंबन घेऊं लागतो. तों रूपखाच्या दाढीस बादशहाचा हात लागून एकदम दचकून रूपखानें दिलेलें आलिंगन सोडवून आणि दूर होऊन )

बाद०—अं, हें काय ह्या सुंदर युवतीच्या हनुवटीस हा केशकलाप कोठला? ( चांगलें निरखून पाहून ) छे, छे; ही ती सुगुणा नव्हे. हा कोणी तरी वेषांतर केलेला आमचाच सरदार असावा.

रू०—( बादशहा दूर गला हें पाहून पुन्हां त्याच्या जवळ येऊन ) असा राग काय ह्मणून. पुरे झाला हा आतां विनोद. ( रूपखाचा शब्द ओळखून. )

बाद०—( रागानें ) अधमा, असा निंद्य वेश घेऊन आणि सुगुणेला येथून पळवून लावून मला असे फसवितोस काय? थांब तुझ्या ह्या कृत्याचें प्रायश्चित्त तुला आतांच देतो ( बादशहा म्यानांतील तलवार बाहेर काढूं लागतो इतक्यांत रूपखाही चांगला सावध होऊन आणि बादशहास ओळखून )

रूप०—हे तर बादशहा. (असें ह्मणून गडबडीनें पळून जातो.)

बाद०—दुष्टा, आतां पळशील कोठें ? हा पहा आलोंच मी तुझा समाचार घ्यायला. ( असें ह्मणून बादशहाही त्याचे पाठीमागें धांवत जातो, तों पडदा पडतो. )

---

# प्रवेश

**स्थळ०— यमुनानदीच्या काठचें जंगल.**

आनंदराव पवार प्रवेश करितो.

**आनंद०—** अहमदशहाच्या अटकेंतून सुटल्यापासून आज पंधरा वीस दिवस मला एकाद्या वंचकाप्रमाणें इथें काळ घालवावा लागला अं! प्रारब्धा खूप केलीस बाबा. तुझ्या तडाक्यांतून कोण सुटणार! जें जें तूं ठरविलें असेल तें तें घडवून आणण्याचें सामर्थ्य खरोखर तुझ्यांतच आहे. आह्मा मनुष्यांचा हेतु एक असतो आणि त्याप्रमाणें आह्मी तसा उद्योग करित असतों, पण तुझी भावितव्यता कांहीं निराळीच असते. असो; आतां आपली इच्छा ह्मटली ह्मणजे माझा जिवकीं प्राण जी माझी सुगुणा तिची भेट घेण्याची आहे. पण ती त्या गिलचांच्या अटकेंत आहे, तेव्हां मला भेटावी कशी? ( थोडावेळ विच्यार करून ) छे, छे; आनंदराव काय तुझे हे विचार. तूं प्रेमानें वेडा होऊन तिच्यासाठीं आपले प्राण व्याकूळ करित बसावें व पाहिजे तीं संकटें सोसावीं आणि तिनें काय, तर, त्या नीच आणि दुष्ट अशा आमच्याच शत्रूवर प्रेम करण्यास तयार व्हावें! खरोखर स्त्रियांचें प्रेम खरें नाहीं. त्या एकाकडे पहात असतील तर त्यांच्या मनांत दुसऱ्याविषयीं विचार चालू असेल, एकाबरोबर बोलत असतील तर त्यांचें अंतःकरण दुसऱ्या विषयींच्या प्रेमानें व्यथित होत असेल, आणि एकाला आपल्या सौंदर्यानें मोहित करून सोडित असतील तर आणखी एकाद्याला आपल्या प्रेमजालांत गुंतविण्याच्या खटपटींत असतील? ( थोडा वेळ थांबून ) पण छे, काय हे माझे चमत्कारिक विचार. सगळ्या भूतळावरील स्त्रिया ह्मणजे काय विश्वयोषिताच आहेत. महत्पाप! महत्पाप! माझ्या ह्या विचारांनीं मी महानुसाध्वी स्त्रियांना दूषण लावून आपल्या अधःपाताची सामुग्री तयारी करीत आहे. ( कांहीं वेळ विचार करून ) माझी सगुणा खरोखर नांवाला कलंक लागेल, अशी आचरण करणारी असेल काय? नाहीं. पण मी तरी तिला तसें ह्मणायचें ह्मणजे केवळ त्या तुरुंगांतील शिपायाच्या ह्मणण्यावरून.

विश्वास ठेवूनच ना ? नाहीं, नाहीं; माझें मन मला असें सांगतें कीं, ती असें निंद्य आचरण करील ह्मणून. आपली स्वतःची खात्री झाल्या-वांचून केवळ दुसऱ्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून उगीच एकाद्याला दोष देण्यास तयार होऊं नये. आपण स्वतः त्याविषयींचा खरेपणा पाहून मग पाहिजे तें ह्मणावें आणि पाहिजे तें करावें. असो; आपण आतां तिची भेट घेण्याचा प्रयत्न करून या गोष्टीबद्दल आपल्या मना-चा संशय फेडून घेऊं. ( किंचित विचार करून ) आतां दादासाहेब पेशवे गिलच्यांचा सूड घेण्यासाठीं इकडे येत आहेत, तर आपण त्यांच्यांत मिळून आपल्या इच्छित कार्याची सिद्धि करण्यास लागावें.

## प्रवेश

स्थळ—दिल्लीच्या जवळील एक मैदान.

( दादासाहेब पेशवे व इतर सरदार प्रवेश करितात. )

**राघो०**—बांडे, आपण तर मोठमोठाल्या मजला मारीत दिल्ली गाठली, पण ह्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां आतां पुढें कसें करायचें.

**बांडे०**—दादासाहेब अहमदशहा तर आतां थोड्यांच दिवसांत अटकेपार जाईल असं ह्मणतात, तेव्हां मला तर कांहींच सुचत नाहीं.

**शितोळे०**—आतां आपण या पुढें किती जरी मोठाल्या मजला मारिल्या तरी गिलचे आपल्या हातीं लागणार नाहींत असं मला वाटतं.

**राघो०**—( आवेशानें ) काय गिलच्या हातीं लागणार नाहीं ह्मण-ता ! हा राघोबा आहे तोपर्यंत कोणालाही असं ह्मणूं देणार नाहीं.

**एक सर०**—दादासाहेब आपलं ह्मणणें बरोबर आहे, कारण आ-पल्या एकट्यालाच जर तसं करायचं असतं तर आपण त्याला केव्हांच गाठून सूड उगवून घेतला असतां; पण आतां तसं थोडेंच करतां येणार आहे. हा सर्व सेनासागर घेऊन आपल्याला प्रयाण करायचं आहे.

**राघो०**—काय, मी राघू ह्मणजेच काय तो घोड्यावर बसणारा धटाईत असं का तुह्मांला वाटतं ! आणि मी म्हणतों कीं, कदाचित् तसं ही असलं, तर नुसतं तेवढ्यानंच कांहीं सर्व होत असतं असं नाहीं.

ज्यांना उत्साह आहे, ज्यांना वीर्य आहे, ज्यांना आपल्या आर्यभूविषयीं प्रेम आहे आणि ज्यांना आपल्या शत्रूचा सूड घेऊन आपलीं काळीं ठिक्कर झालेली तोंडें उज्वल करावयाचीं आहेत. तो प्रत्येक महात्मा वायुगतीनें धांवत जाऊन आपल्या शत्रूला निमिषार्धांत गांठील. मग माझीच ती प्रौढी कशाला पाहिजे.

**बांडे०**—दादासाहेब, आपण ह्मणतां त्याप्रमाणें आह्मां प्रत्येकाला तसं वाटत आहे आणि ह्मणूनच आह्मी आज इतके दिवस आपल्या ह्यां क्षणभगुंर देहाकडे न पाहतां आपणाबरोबर पाहिजे अशा मोठाल्या मजला मारल्या आणि पुढेंही पाहिजे इतक्या मारूं. पण आतांचा जो आपला प्रवास आहे तो फार कठीण आहे, हें आपल्याला माहीत आहेच. कारण, पुढें पुढें पाण्याची फार टंचाई आहे. पाण्यावांचून कसें काय चालणार? आपलीं हीं शरीरें तरी त्या अहमदशहाची भेट होईपर्यंत अशीं कायम राहिली पाहिजेतना? तेथें जाऊन पाहिजेतर धारातीर्थी देह ठेविले तर कांहीं वाईट होणार नाहीं; पण मध्येंच पाणी पाणी करून प्राण सोडण्याचा समय आला तर मग मात्र कठीण.

**राघो०**— बांडे, आपल्याला तृषा लागून कित्येक दिवस लोटले आहेत आणि ती शमविण्यासाठींच आपण चाललों आहों. आपली तृषा नुसत्या उदकपानानें कधींही तृप्त होणार नाहीं. तशीच आपली क्षुधाही अन्नसेवनापासून शांत होणार नाहीं. आपल्याला असेंच तृषार्त व क्षुधार्त राहून त्या गिलचांना गांठले पाहिजे. आणि ह्या आपल्या आर्यभूत त्यांचें रक्तपान करवून आपली तृषा पार नाहींशी करून टाकिली पाहिजे, व त्यांच्या संपत्तीच्या लुटीनें आपली क्षुधा घालविली पाहिजे.

(इतक्यांत बाजूस हर हर महादेव ! ह्मणा ! मारा ! कसूर करूं. नका असे भयानक शब्द ऐकूं येतात. त्यामुळें सर्व सरदार घाबरून जातात.)

**शितोळे:**—दादासाहेब, आपणांवर हा एकदम घाला कोठून आला ! आतां कसें करावें ?

**बांडे:**—शितोळे, असें गडबडतां कां ? आह्मीं आपण जरी बेसावध आहों तरी त्या शत्रूंना चांगला हात दाखवून मराठे विरांचा पराक्रम कसा काय असतो हें त्यांच्या प्रत्ययास आणून देऊं.

राघो०—बांडे, शितोळे इतके उतावीळ आणि घाबरे कां होतां? आपण प्रथम ते कोण आहेत हें पहाण्यासाठीं तिकडे जाऊं. ते कोणी-ही असले तरी आपले शत्रू खास नव्हेत अशी माझी खात्री आहे. कार-ण त्यांनीं आरंभीच हर हर महादेव अशी आरोळी ठोकिली आहे. या-वरून ते मराठेच असले पाहिजेत.

शि०—मराठे! आणि आतां ते इथें कोठून?

राघो०—संशय कशाला. चला आपण प्रत्यक्षच पाहूं.

बांडे०—हो चला. पण सर्वजण सावधगिरीनेंच असा. कारण, काय आहे आणि काय नाहीं.

(असे म्हणून सर्वजण बाजूस जातात. इतक्यांत रंगभूमीवर एकदम काळो-ख पडून पिशाच्चें पुनः पूर्ववत् ओरडतात. तों गेलेले सर्व सरदार दुस-ऱ्या बाजूनें प्रवेश करितात. व पिशाच्चें पाहून एकदम चकित होतात.)

राघो०—शितोळे, हा काय चमत्कार! हीं इतकी पिशाच्चें एकदम इथें काय म्हणून?

शितोळे०—कांहींच कळत नाहीं. आपण स्वप्नांत तर नाहीं ना?

(इतक्यांत मराठ्यांचें नांव घालवूं नका. पेशव्यांच्या धवलकीर्तीवर कालि-मा फासू नका. ह्या पानपतचा अपजय आपल्या आर्यभूला रसा-तळाला पोंचवील. चला, लढा, शर्थ करा. असें म्हणून पिशाच्चें इकडे तिकडे धांवतात व निरनिराळे हातवारे व अंग-विक्षेप करितात.)

राघो०—बांडे, शितोळे, पहा ही वीरश्री आणि आपल्या मराठे वीरांची अतृप्त राहिलेली मनीषा (पिशाच्यास उद्देशून आणि प्रेम व दुःख हीं एकवटून,) बाबांनों तुम्हीं केवळ आपल्या देशाभिमानाकरितां-धर्माभिमानाकरितां आणि मराठ्यांच्या नांवाकरितां आपल्याला विजयश्री मिळाला नाहीं ह्या अपूर्ण राहिलेल्या इच्छेस्तव अशी दुर्गति भोगित आहांना? तुमच्या मे ल्या आत्म्यानांही अद्याप स्वाभिमान आहेना आणि शत्रूंचा नायनाट करावा असें तुमचें प्रत्येक इंद्रीय तुम्हाला सांगत आहे-ना? हर हर! आम्ही जर तुमची तीं इच्छा तृप्त केली नाहीं तर तुम्हाला असं-च सदैव तळमळत रहावं लागेलना? (मध्येंच सूड! सूड!! म्हणून पिशाच्चें

ओरडतात ) थांबा, थांबा; माझ्या वीरहो. त्या अहमद शहाच्या नरडी-च्या घोट घेऊन लवकरच तुह्माला ह्या स्थितींतून मुक्त करतों. ( शाबा-स, शाबास माझे मराठे बहाद्दरांनो असें पिशाच्च ओरडतात ) सरदारहो, पहा; आपल्या मृतवीरांनाही शत्रूंचा उत्कर्ष सहन होत नाहीं इतकेंच नाहीं तर ते धारातीर्थी पतन होऊनही केवळ मराठ्यांना विजय मिळाला नाहीं, ह्या अपूर्ण राहिलेल्या इच्छेस्तव सद्गतीला न जातां अधोगति भोगीत आहेत. आपण जर त्यांना असेंच अधोगतींत राहूं दिलें तर ते आपल्याला काय ह्मणतील. आणि त्यांनीं असें नरकपंकांत चरफडत राहिल्यावर आपल्या सजीवत्वाचा तरी काय उपयोग ? नाहीं, नाहीं, चला, निघा वेगानें. आतां ह्मणून विश्रांति नाहीं, क्षुधा नाहीं, तृषा नाहीं किंवा निद्रा नाहीं. त्या अहमदशहाला तो अटकेपार गेला तरी कांबू-ल-कंदाहारास गांठूं, इतकेंच नव्हे तर तो सप्तपाताळांत दडून बसला किंवा स्वर्ग लोकीं पळाला, तरी त्याचा तेथेंही शोध करून पुरा सूड उगवून घेऊं आणि आपल्या अधोगति भोगित असलेल्या शूर वीरांना सद्गति देऊं. ( पिशाच्चें पुन्हां ह्मणा, मारा, ठोका, चोपा, घ्या सूड उगवून, ह्मणा हरहर महादेव. असें ओरडतात. त्याचवेळीं सर्व सर-दार हरहर महादेव व सूड ! सूड ! ह्मणून ओरडत निघून जातात.)

## प्रवेश ४ था.

### स्थळ सिंधूनदाचा तीर-

मुसलमान सरदाराचा वेश घेतलेली सुगुणा प्रवेश करिते.

सु०—त्या रूपखाच्या हातावर तुरी देऊन हा पुरुषवेश घेऊन त्या अटकेंतून बाहेर पडले आणि तेव्हांपासूनची या वेशाची वतावणीही मला चांगलीच साधली. राजे लोक आणि कारस्थानी पुरुष फार धूर्त व चाणाक्ष असतात असं मी ऐकत होतें. तेव्हां माझें हें रूपांतर त्यांच्या लक्षांत येऊन माझा हा बेत कदाचित् फसेल आणि मला पहिल्या-प्रमाणेंच संकटांत पडावं लागेल असं वाटत होतें, पण आतां ती भीति मुळींच राहिली नाहीं. बादशहानं मला काल आपल्याबरोबर शिकारीस नेलं आणि त्या वेळीं माझं धाडस आणि अचूक नेम.मार-

त्याचें कौशल्य पाहून मी चांगलाच शूर पुरुष आहे अशी त्याची पक्की खात्री झाली. आतां मराठे पानपतच्या अपजयाबद्दल त्याचा सूड घेण्यासाठीं इकडे येत आहेत, तेव्हां मी अहंमदशहास मिळाल्याबद्दल तर तो ईश्वराचे फारच आभार मानित आहे. ह्या समयाला बादशहाची सगळी भिस्त मजवरच आहे. आतां मला मराठे वीरांचे विरुद्ध या सिंधुनदाच्या वाळवंटांत शस्त्रास्त्रें घेऊन सज्ज रहावें लागणार आहे. पण ही सर्व बाहेरची तयारी. आंतील तयारी फारच निराळी आहे. अहंमदशहा मुला माझा पराक्रम पाहून फार आनंद झाला आहे पण त्याचा तुला काय उपयोग! वेळेस तोच तुझ्या नाशास कारण होईल. असो, बादशहानें मला लढाईवर नेण्याचें ठरविलें आहे तें एक प्रकारें चांगलेंच झालें आहे. कारण माझी इष्टकामना—माझे प्राणनाथ मला भेटण्याची उत्कट इच्छा—सिद्धीस जाण्याला तें एक साधनच होत आहे माझे प्राणनाथ बादशहाच्या प्रतिबंधांतून निसटून दादासाहेब पेशवे इकडे येत आहेत त्यांना मिळाले असतील. तेव्हां ते ह्या समरांगणावर आपली तलवार गाजविण्यास खात्रीनें पुढें सरसावतील आणि अशा रीतीनें त्यांची माझी दृष्टादृष्ट झाल्याबरोबर मी कोणत्या तरी प्रकारानें त्यांना जाऊन भेटेन. ह्या युक्तीनें मी त्यांना जाऊन भेटणें हा मार्ग कठीण आहे आणि कोणी मला ह्मणतील कीं, यापेक्षां सुलभ रीतीनें मला तसें करतां येण्यासारखें होतें. पण मी मुद्दामच आपलें शौर्य, धाडस आणि प्रसंगावधान कसें आहे हें पाहण्याकरितां, व बादशहाचें चातुर्य आणि राजकार्यदक्षता ह्याची परिक्षा घेण्यासाठींच हा बिकटमार्ग पतकारला आहे. पण माझें हें कृत्य प्राणनाथांना कळल्यावर तें मला ह्याबद्दल दोष तर देणार नाहींतना? ( थोडा वेळ विचार करून ) छे, ही शंकाच नको. मी सुरक्षितपणें त्यांना भेटल्यावर आणि ही घडलेली सर्व हकीगत त्यांना समजल्यावर ते माझी खात्रीनें तारीफच करतील. बरं असो, आतां पुष्कळ वेळ झाला आहे तेव्हां अहंमदशहा माझी वाट पहात असेल ह्मणून आपण तिकडेच जावें.

( असें ह्मणून सुगुणा निघून जाते. )

# प्रवेश ५ वा.

## स्थळः–सिंधूनदाजवळील प्रदेश.

अहमदशहा व कांहीं सरदार आपल्या तंबूंत बसले आहेत असा प्रवेश होतो.

**अह०**—( शहावलीखानाकडे पाहून ) वजीर, आतां हा प्रसंग मात्र फार कठीण आला आहे. आपण पानपतास त्या मराठ्यांचा चांगला खरपूस समाचार घेतला खरा, पण ह्या वेळेस त्याच्या उलट होण्याचा समय आहे. तो दादासाहेब पेशवा सिंहाप्रमाणें खवळून आपल्यावर झडप घालण्यास अगदीं नजीक येऊन ठेपला आहे आणि आपल्या-जवळ तर त्याच्याबरोबर सामना करण्याइतकें सामर्थ्य नाहीं. पानपता-च्या समरभूमीवर आपल्याला नजीबखान रोहिल्याची व सुजाउद्दवल्याची चांगली मदत होती, पण आतां त्यांच्यांतील कलहामुळें ती नाहींशीं झाली. नाहींतर दादासाहेब पेशव्याला कांहींएक प्रतिबंध न होतां येथवर येतांच आले नसते. असो, झालेल्या गोष्टीला उपाय नाहीं. पण आतांची ही वेळ कशी निभावून न्यावी, हा मोठा बिकट प्रश्न आला आहे.

**वजीर०**—हुजूरनीं असें फिकिरींत पडण्याचें मला तर कांहीं कारण दिसत नाहीं. कां तर, जरी मराठे आपणावर पुनः चाल करून येत आहेत तरी त्यांचीही चांगली जय्यत तयारी असेल, असें मला वाटत नाहीं.

**अह०**—वजीर, तुह्मी असें कशावरून ह्मणता ?

**वजी०**—खाविंद, आपणाला हा संशयच कां असावा? अहो, आपण त्यांच्या खऱ्या शूर आणि रणधुरंधरवीरांना कधींच धूळ चारून यमसदनास पाठवून दिलें आहे. आतां मराठे योद्ध्यांत दादासाहेब पेशव्यांवांचून कोणी शूर जवानमर्द राहिलेला मला तर दिसत नाहीं. तेव्हां तो एकटा काय करणार आहे ?

**अह०**—वजीर, राघोबादादा ह्मणजे तुह्मी काय सामान्य समजत आहा ! तो एकटाच-पांच पंचवीस सेनानायकांचें काम करील.

वजी०–कबूल, पण सैन्य तरी पाहिजेल ना तसें करायला.

अह०–सैन्य नसेल असें म्हणतांच येणार नाहीं. पांच पंचवीस हजार स्वार, व शिपाई त्यांजबरोबर असतीलच. शिवाय वेळ पडल्यास एकटा दादाच पांच दहा हजार शिपायांचें काम करण्यास कमी करणार नाहीं.

वजी०–एवढेंच असेल तर आपण म्हणजे त्यांना हार जाऊं असें नाहीं वाटत. आपल्याजवळही वीस पंचवीस हजार स्वार व बरेच पायदळ तयार आहे. आणि आपण व मी त्यांना योग्य दिशा दाखविण्याला तयार आहों.

अह०–हो, तें तर आहेच. शिवाय कालच नजीबखान रोहिल्याचा एक सुरूपखान नांवाचा सरदार त्यांशीं बेबनाव झाल्यामुळें आपणांस येऊन मिळाला आहे. खरोखरच तो युद्धकलेंत फार निपुण आहे. काल मी व तो शिकारीस गेलों होतों, तेव्हां त्यानें जें कौशल्य केलें तें प्रत्यक्ष पाहणारांवांचून इतरांना समजणें कठीणच आहे. मी तर त्याची ती कर्तबगारी पाहून अतिशयच चकित झालों. आणि तेव्हांपासून माझ्या मनात असेंही आलें आहे कीं, त्याच्या ताब्यांत पांच दहा हजार स्वार देऊन त्याला मराठ्यांवर पाठविलें तर तो आपली बाजू चांगलीच राखील.

वजी०–हो, मीही तसें ऐकलें खरें. पण ते आज अजून कोठें दिसत नाहींत.

अह०–त्यांना मी दरबारास बोलाविलें आहे. बहुतकरून ते थोड्याच वेळांत यावेत असें मला वाटतें. ( इतक्यांत मुसलमानी सरदाराचा वेश घेतलेली सुगुणा प्रवेश करून बादशहास मुजरा करिते व वजीर तिला आपल्या जवळ बसण्यास जागा देतो. )

वजी०–( सुगुणेस उद्देशून ) सुरुपखान, आपल्या येण्याची बादशहा फार वाट पहात होते.

सुरूप०–मला येण्यास अंमळ वेळ झाला, ह्मणून हुजूरला तकलीफ झाली असेल त्याची मला क्षमा असावी.

अह०–छे, छे; तसें कांहीं नाहीं. आपण वेळेवरच आला अहां

**सुरूप०**—असं असेल तर मग खाविंदनीं या दासाला काय तो हुकूम करावा.

**अह०**—आपल्या सारखे हुकमाची वाट पहाणारे सेवक फार थोडे असतात. आपल्या शब्दांनींच आपण माझा हुकूम बजाविलांत असें मी समजतों. असो; आपल्यावर मराठे पुनः चाल करून येत आहेत तेव्हां त्यांचं चांगलंच पारिपत्य करण्यासाठीं आपण तयार अहां, अशी माझी खात्री आहे. पण अगोदर सूचना असावी एवढ्या करितांच आज आपल्याला बोलाविलें आहे.

**सुरूप०**—( आपल्याशीं ) मराठ्यांची खोड मोडायची विसरा ह्मणावं. आतां त्या दादासाहेबांशीं गांठ आहे. ( उघड ) खाविंदचा हुकुम होण्याचा अवकाश कीं, चाललोंच मी त्या मराठ्यांच्या नरडीचा घोट घ्यायला. त्यांची पानपतास झालेली दशा त्यांना पुरेशीं झाली नाहीं ह्मणून ती इच्छा पुरी करून घेण्याकरितां ते आतां येत आहेत वाटतं.

**एक सरदार०**—अहो सुरूपखान, आपण कोणाची खोड मोडणार आहां तें अगोदर लक्षांत आणलं अहात कां ? त्या दादासाहेबांशीं गांठ आहे आतां.

**सुरू०**—काय म्हणता हो तुह्मी अशा भित्र्या भागुबाई सारखे ! दादासाहेब ह्मणजे कायते योद्धे आहेत आणि आह्मी कां हातांत बांगड्या भरल्या आहेत ! ( स्वगत ) सुगुणे, आमळ अंगरख्याच्या बाह्या वर सरल्या तर हातांत बांगड्या आहेत कां काय आहे तें लोकांना कळणार आहे.

**अह०**—सुरूपखान, दादासाहेब पेशव्यांशीं टक्कर देणें हें काम कठीण तर खरेंच पण आपल्या सारख्यापुढें दादा देखील कःपदार्थ ठरेल.

**सुरू०**—माझी इतकी स्तुति करायला नको आहे. मी असें ह्मणतों कीं, कोणताही मनुष्य धैर्य धरून उत्साहानें व सावधगिरीनें जर काम करील तर त्यांत त्याला यश हें आलेंच पाहिजे.

**वजी०**—पण सर्वांनाच कुठें तसें करितां येतें. तसें करितां येत

नाहीं ह्मणूनच ज्या विभूति आपण ह्मणतां तशा वागतात त्याच प्रसिद्धीस येतात.

अह०-असें नसतें तर सर्वच शूर, राजकारस्थानी व ब्रह्मवादि बनले असते व एकच गोंधळ उडून गेला असतां. असो; वजीर, आतां राघोबा केव्हां अचूक येऊन आपल्यावर छापा घालील हें सांगतां येणार नाहीं, तेव्हां आपण आपली व्यवस्था लावून सावधगिरीनेंच असले पाहिजे.

सुरूप०—अलबत तसें तर केलेंच पाहिजे पण शिवाय आपले हुशार गुप्त हेरही त्यांच्या बातमीवर ठेविले पाहिजेत. ह्मणजे त्यांची कारस्थानं आपल्याला समजून तशी व्यवस्था करण्यासही ठीक पडेल.

वजी०—ती सर्व व्यवस्था मी ठेवितों.

अह०—ठीक आहे, हें एक झालें; पण आतां मराठ्यांना तोंड देण्यासाठीं कोणी कसें रहावें हेंही ठरवून ठेविलेंच पाहिजे.

वजी०—मला वाटतें कीं, आपण सिंधूनद उतरून पलीकडे जावें, ह्मणजे मराठ्यांना आपल्यावर चाल करून येण्यास फार कठीण जाईल.

अह०--छे, छे; तसें करून उपयोग नाहीं. कारण राघोबादादा अगदींच नजीक येऊन ठेपला आहे, आपण नद उतरावयास लागलों आणि मराठ्यांनीं आपणावर एकदम हल्ला केला, तर आपल्याला पाण्यांतच बुडून मरण्याची पाळी येईल.

सुरू०--( स्वगत ) दादासाहेब पेशवे जवळ आले आहेत असं मी ह्यांना कळविलें आहे, पण ते अजून बरेंच लांब आहेत. त्यांना येथवर येण्याला निदान दोन दिवस तरी लागतील आणि तेवढ्या मुदतींत ह्यांना सहज अटकेपार जातां येईल.पण असें झाल्यावर मराठ्यांना गिलच्यांचा चांगलासूड घेतां येणार नाहीं.ह्मणून अहमदशहा आपला तळ येथून हालविणार नाहीं अशीच युक्ति योजिली पाहिजे. ( उघड ) हुजूर, आपलं ह्मणणें बरोबर दिसतें, कारण राघोबादादा कालपासून या आसपासच्या भागांत आला असून तो किंवा त्याचें सैन्य कोठें आहे

हेंही समजत नाहीं; तेव्हां तो आपल्याला कोणत्या अडचणींत गांठील हें सांगतां येणार नाहीं. शिवाय वजीरांच्या ह्मणण्याप्रमाणें आपण सिंधूनद उतरून पार पडलों,तरी लोक आपल्याला मित्रपणाचा दोष देतील. आणि मराठे तर, आह्मी गिलचांना अटकेपार घालवून दिलें अशा खोट्या बातम्या उठवून देऊन आपल्याला खालीं पहावयास लावतील.

**अह०**—हा प्रसंग तर फारच अडचणीचा आहे. कारण सिंधुनद उतरून पलीकडे जावें तरीही अडचण,न जावें तरी अडचण. कदाचित् मराठ्यांशीं युद्धास तोंड दिलें आणि त्यांनीं आपल्याला खेचीत खेचीत मागें हटविलें तर सिंधूनदांतच सर्वांना जलसमाधी घ्याव्या लागतील.

**वजी०**—खाविंद, आपण अशा भलत्याच शंका मनांत कां आणितां ? आपण त्या मराठ्यांना अशा अडचणीच्या जागींही आपला पराक्रम गाजवून दाखवूं. आणि तसें होण्यासाठीं हुजूरनीं दादासाहेब पेशव्यांशीं सामना देण्याकरितां ते ज्या दिशेनें आपणावर येतील त्या बाजूवर मला नेमावें; ह्मणजे मी जें ह्मणतों तें हुजूरच्या प्रत्यक्ष प्रत्ययास आणून देतों. माझी तर अशी खात्री आहे कीं, मी ज्या जागेवर एकदां उभा राहीन, त्या जागेवरून कसेंही प्रसंग आले तरी एक रतिभरही मागें हटणार नाहीं.

**अह०**—तसें तर झालेंच पाहिजे, पण वेळ प्रसंग असतो, तेव्हां साधक बाधक विचार करून तजवीज करणें चांगलें. ( सुरूपखानाकडे पाहून ) कां सुरूपखान, मी ह्मणतों हें खरें आहे की नाहीं ?

**सुरू०**—हो, हो; आपणाला पुढें काय काय अडचणी येतील आणि तसें झालें तर त्यांतून कसें पार पडावें, ह्याचा पूर्वींच विचार केलेला बरा.

**अह०**—वजीर, मला वाटतें कीं, मराठे दक्षिणेच्या बाजूनेंच आपल्यावर चाल करून येतील. तेव्हां तुह्मी पंधरा हजार स्वारांनीशीं ती बाजू संभाळून रहावें, आणि आमच्या सुरूपखानांनीं दहा हजार स्वारांसह पश्चिमेकडील बाजू दाबून धरावी. बाकीच्या सरदारांनीं व सैन्यानें पूर्वेकडे रहावें, आणि मी मध्यें राहून जिकडे कच खाण्याचा प्रसंग येईल तिकडे मदत करावी.

**वजी०**—ठीक, ठीक. मीही असेंच म्हणणार होतों. ( सुरूपखाना कडे पाहून ) कां सुरूपखान, आहेना ही योजना पसंत ?

**सुरू०**—असलीच पाहिजे. हुजूरनीं केलेली व्यवस्था अगदी बरोबर व्हावयाचीच.

**अह०**—( बसलेल्या सर्व सरदारांस उद्देशून ) सरदार हो, आपण पानपतच्या रणमैदानावर आपलें शौर्य गाजवून आपल्या कीर्तीचा डंका दिगंतरी गाजाविलात तसाच ह्यावेळींही गाजविला पाहिजे. नाहींतर आपला आतां पर्यंतचा सर्व प्रयत्न निष्फल होऊन उलट दुष्कीर्ति पदरांत येणार आहे. तुह्मी सर्व एक दिलानें झटून वेळ पाहून मराठ्यां वर तुटून पडलांत तर माझी पक्की खात्री आहे कीं, दादासाहेब पेशवा असो किंवा एकादा भीमासारखा दुसरा प्रचंड योद्धा असो, त्याला नेस्तनाबूद कराल.

**एक सरदार०**—आह्मी कसाही प्रसंग आला तरी माघार घेणार नाहीं. फार काय, वेळ आल्यास मरून जाऊं पण आपलें नांव घालविणार नाहीं. आणि आमचीही अशी हिम्मत आहे कीं, हुजूरच्या पुण्यप्रतापानें त्या दादासाहेब पेशव्याला धरून आपल्या जवळ हजर करूं.

**अह०**—शाबास माझ्या वीरहो, असें तुमच्या सारखें दृढनिश्चयाचे आणि हिम्मत बहाद्दर असल्यावर काय होणार नाहीं त्या दादासाहेबाची कथा काय पण ह्या हिंदुस्थानांतील प्रत्येक हिंदूला नामशेष करून टाकूं. ( सुरूपखानाकडे व वजीराकडे पाहून ) वजीर, सुरूपखान, झाला आतां ह्याप्रमाणें निश्चय. तेव्हां ज्यानें त्यानें आपापली तयारी करून हुशारीनें असावें.

**सर्वसरदार०**—ह्यांत यत्किंचितही चूक होणार नाहीं.

**अह०**—ठीक आहे तर आजच्या दरबारचें काम पुरें झालें.

( चोपदार ललकारतात व पडदा पडतो. )

---

## प्रवेश ६ वा.

### स्थळः—सदर

आनंदराव पवार एकटाच उभा आहे असा प्रवेश होतो.

**आनं०**—दादासाहेबांची भेट तर झालीच. पण आतां माझ्या

त्या आनंदी–सुगुणे–ची भेट कशी होणार! ( अम्मळ विचार करून ) हो, आतां हीच युक्ति योजावी. लढाईला सुरुवात झाली ह्मणजे यवनी-वेशांतर करून अहमदशहाच्या छावणींत शिरावें आणि मग आपल्या प्राणप्रियेचा शोध करून तिला तेथून घेऊन यावें. ( पुनःअम्मळ विचार करून ) पण मी असें निंद्य वेशांतर केलें आणि ते आमच्यांतील मराठे वीरांस समजलें तर ते माझी फारच विटंबना करतील. आणि जिकडे तिकडे छी, थू होऊन मला कोठें तोंड दाखविण्यासही जागा उरणार नाहीं. ( थोडा वेळ थांबून ) पण नाहींच. यावांचून माझ्या आनंदीची माझ्या सुगुणशालीची भेट होण्याला दुसरा मार्गच दिसत नाहीं. बरं, मी ह्मणतो कीं, असें वेशांतर केलें तर तें आपल्या लोकांना कसें कळण्याचा संभव आहे. कांहीं नाहीं. उगीच मनांत भलभलत्याच कल्पना येऊन व्यर्थ कर्तव्य पराङ्मुख करितात. असो, हाच निश्चय कायम. पण अशा रीतीनें आपण तिकडे जाऊनही कदाचित ती बादशाहाच्या अटकेंतच असली तर माझी तिची भेट कशी होईल? पण ही शंका आपल्याला आधींच कशाला पाहिजे. तेथें जाऊन जसा समय येईल तसें करितां येईल.बरं, बोलतां बोलतां बराच वेळ गेला, दादासाहेब पेशवे वाट पहात असतील तेव्हां आपण तिकडेच जावें.

( असें म्हणून आनंदराव पवार एका बाजूनें जातो तो दादासाहेब पेशवे, बांडे, शितोळे व इतर सरदार बसले आहेत असा पडदा उघडतो. )

**राघो०**—सरदार हो, आनदराव पवारानें सांगितलेली हकीकत ऐकल्यापासून मला तर असें होऊन गेलें आहे कीं; मी त्या अहमदशहाच्या नरडीचा घोट केव्हां घेईन. अरे नीचा! आमचे मराठे दीन होऊन तुझ्या हातांत सांपडले असतां त्यांची तूं निर्दयपणानें कत्तल केलीस काय? आणि असें करितांना तुला मी हें मोठें शौर्याचें काम करीत आहे असें वाटलें काय! अरे असें शौर्य हातांत कांकणें भरलेल्या अबलांनाही शोभत नाहीं. बर असो, आतां तूं सावध रहा. हा राघोबा प्रतिज्ञेप्रमाणें तुझ्या ह्या दुष्ट कृतीचा सूड घेण्यास आला आहे. ( इतर सरदाराकडे पाहून ) बांडे, शितोळे, आपण ह्या शिखानांवर वेळ साधून एकदांच असा हल्ला केला पाहिजे कीं, आपल्याला

शरण आल्यांवाचून दुसरी सोयच नाहीं, असें त्यांना वाटलें पाहिजे. ( इतक्यांत आनंदराव पवार प्रवेश करितो त्यास पाहून इतर सरदार त्याच्या मानाप्रमाणें बसण्यास जागा देतात. )

**आनं०**–दादासाहेब, मी आपल्याला सांगावं असं नाहीं. ते अविंध विजयमदानें धुंद होऊन हल्लीं फारच अविचारानं वागत आहेत. तेव्हां आपण ह्या वेळेस थोडे साहस केल्यास आपल्याला या मुसंड्यांची खोड तेव्हांच मोडून टाकतां येणार आहे. शिवाय अहमदशहाचे सैन्याच्या तळ सिंधू नदाच्या कांठीं आहे हेंही आपल्याला अनुकूल साधन झालें आहे. त्यांच्यावर चालून जाऊन जर आपण त्यांना मैल दोन मैल हटवीत हटवीत मागे नेले तर पाण्यांत बुडून मेल्यावांचून त्यांना दुसरी गतीच नाहीं.

**राघो०**—छे, छे; अशा रीतीनें पेंचात आणून शत्रूला हताश करणें हें खऱ्या शूर वीरांना योग्य नाहीं. त्यांनीं शत्रूंना आपला शौर्य-प्रताप तलवारीच्या जोरावरच दाखविला पाहिजे.

**बांडे०**—दादासाहेब ह्मणतात हेंच खरें. नाहींतर कोठें फसवून पाण्यांत बुडवून मार, कोठें कोणास किल्ल्यांत किंवा राजवाड्यांत कोंडून त्याला अग्नी लावून जाळून टाक. हें कां शौर्य ? असें कृत्य एखाद्या सामान्य मनुष्यालाही करितां येणार आहे.

**आनं०**—आहो, बांडे कौरवांनीं पांडवांना लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयत्न केला होता मग आपणच तसें केलें तर त्यांत काय दोष ?

**राघो०**—मग याबद्दल लोक कौरवांची स्तुति करितात कीं काय! आणि आनंदराव तुमची मनोदेवता तरी कौरवांनीं तें कृत्य करून मोठें शौर्य गाजविलें व वीरपुरुषाला उचित असेंच कर्म केलें असें सांगतें काय ? अहो, त्याला कोणीही कपटच ह्मणतील तें धर्म युद्ध नव्हें.

**आनं०**—दादासाहेब नीति आणि राजनीति फार निराळी आहे.

**राघो०**—असेल तसें, पण मी तरी त्याप्रमाणें वागणारा नाहीं. मी आपलें शौर्य बाहुबलावर व असिधारेवरच गाजविणार आहे.

**बांडे०**–मीही पण असेंच करणारा आहे.

**आनं०**–आणि आमच्यांत तसें सामर्थ्य नाहीं, असें का समजता

आनंद०—हो, हो; दादासाहेबांनीं असंच करावं. पाहिजे तर एका बाजूवर मी हल्ला करून त्यांची दाणादाण करून टाकतों.

राघो०—कशाला पाहिजे असें करायला? मीच तें सर्व करीन.

बांडे०—आपल्याला तसें करतां येईल, नाहीं असें नाहीं; पण आम्ही ह्मणतों कीं, एकानेंच दोन कामें करण्यापेक्षां तीं निरनिराळीं झालीं तर बरीं.

राघो०—ठीक, तसें कां होईना.

आनंद०—मी दक्षिणेच्या बाजूनें त्यांच्यावर चाल करून जातों आणि दादासाहेबांनीं माझे मागोमागच जोरानें हल्ला करावा, ह्मणजे अहमदशहास आपल्याला लवकर गाठतां येईल.

राघो०—बांडे, तुह्मी पूर्वेच्या बाजूनें वजीर शहावलीखान याच्यावर चाल करून जावें. आणि (शितोळ्यांकडे पाहून) शितोळे, तुह्मी अग्नेय दिशेनें आपला मारा चालूं करावा. मी व आनंदराव पवार पश्चिमेच्या बाजूनें हल्ला करण्यास सुरुवात करितों.

शितो०—ठीक आहे. सरकारचा जसा हुकूम होईल तशी कामगिरी बजावण्याचें काम आमच्याकडे.

राघो०—मग उठा, घ्या तर शिवाजी महाराजांचें नांव, व घाला आपापल्या तरवारीस हात, आणि ह्मणा हर हर महादेव.

(सर्वजण उभे राहून शिवाजी महाराजकी जय व हरहर महादेव ह्मणून ओरडतात.)

राघो०—चला मित्रा माझ्यामागें वायुवेगानें ह्मणजे निमिषार्धांत जाऊन त्या गिधच्यांवर हल्ला करूं. (असें ह्मणून राघोबादादा पुढें व त्याचे मागें आनंदराव पवाराशिवाय सर्व सरदार हरहर महादेव म्हणत व बंदुकांचे बार करीत निघून जातात.)

(आनंदराव पवार पुढें येऊन)

आनं०—झाली, येथपर्यंतची सर्व तयारी ठीक झाली. आतां आपण यवनीवेशांतर करावें (आपल्याजवळील यवनी वेश काढून यवनी वेश घेतों) हं, हेंही आटोपलेंच. बरं मी ह्मणतों आपल्याला अहमदशहाच्या छावणींत शिरून माझ्या मनरमणीचा शोध काढण्यास काय अडचण येणार आहे? (थोडावेळ थांबून विचार करतो.) छे, कांहीं

च नाहीं. माझा असा वेश असल्यावर त्या मुसंडच्यांत वाटेल तेथें संचार करण्याची मला मोकळीक आहेच. ठीक आहे आतां आपण प्रथम हल्ला करून थोडीशीं गडबड उडतांच एकदम गिलच्यांत जाऊन मिळावें आणि करावा आपल्या प्रियतमेचा शोध. ( इतक्यांत हरहर महादेव ह्मणून मराठे वीर ओरडतात व बंदुकांचे बार होतात. ) काय, हल्ला करण्यास सुरुवात झाली वाटतं. चला आपणही आपलें काम बजाविलें पाहिजे. ( असें ह्मणून आनंदराव पवार एका बाजूनें जातो. तो दुसऱ्या बाजूनें अहमदशहा व त्याचे सरदार वगैरे गडबडीनें प्रवेश करितात. )

**आनं०**—हं. आले मराठे, चला करा आत उद्युक्त तयारी आणि सांभाळा आपापली ठिकाणें. कोणीही गडबडू नका, धैर्य सोडूं नका किंवा उगीच घाईही करूं नका. त्या मराठ्यांना अचानक पेंचांत गाठून द्या उडवून त्यांची कत्तल !

**वजी०**—आपण सावधगिरीनेंच होतो. ह्मणून ठीक झालें. नाहींतर मराठ्यांनीं हा अचानक घाला घातला असतां, तर आपली दाणादाण उडून गेली असती.

**अह०**—आपल्याला मराठ्यांकडची बातमी ह्या सुरुपखानानीं दिली ह्मणून आपल्याला आपली व्यवस्था करितां आली. ह्याबद्दल आपण त्यांचे उपकार मानिले पाहिजेत.

**सुरु०**—माझे उपकार मानण्याचें कांहींच कारण नाहीं, तें माझें कर्तव्य होतें आणि तें मी केलें.

( पडद्यांत पुन्हां हरहर महादेव म्हणून ओरडतात व बंदुकाचें बार होतात. ते ऐकून )

**अह०**—( सर्व सरदारांकडे पाहून ) सांभाळा माझ्या शूर मर्दांनो! आले ते मराठे ! चला करा हल्ला जागन ! बोला दीन ! दीन !

( असें ह्मणून अहमदशहा व सर्व सरदार जाऊं लागतात तों मराठे वीर प्रवेश करून हरहर महादेव म्हणून ओरडत त्यांच्या पाठोपाठ जातात, इतक्यांत एका बाजूनें आनंदराव पवार प्रवेश करितो. )

**आनं०**—शाबास माझ्या शूर मराठ्यांनो ! पहिल्याच हल्ल्यांत त्या शिखानष्टांना दे माय धरणी ठाय करून टाकलें ! धन्य धन्य आहे तुमची ! ( थोडा वेळ विचार करून ) बरं आतां आपण गिलचां-

घ्या सैन्यांत प्रवेश करावा. ( असें ह्मणून जाऊं लागतो तोंच मुसलमानी सरदाराचा वेश घेतलेली सुगुणा प्रवेश करिते. )

**सुगु०**—( वेशांतर केलेल्या आनंदराव पवारास पाहून. ) हा मुसलमान सरदार मराठ्यांच्या बाजूनें इकडे येत आहे हें काय बरं असावं. ( अम्मळ विचार करून ) मला वाटतं हा अहमदशहाचा हेर असून तो मराठ्यांकडील बातमी घेऊन येऊन बादशहाला जाऊन कळविणार आहे. ( थोडासा रागाचा आवेश येऊन ) अरे मुसंड्या, असं आहे काय ? पहातें आतां तूं मराठ्याकडील बातमी गिलच्यांना कशी पोंचवितोस तें !

**आनं०**—( मुसलमानी वेश घेतलेल्या सुगुणेस पाहून ) हा नीच शिखानष्ट एकटाच कुठं चालला आहे बरं ! ह्याच्या ह्या जाण्यांत कांहीं तरी गुप्त हेतु असेल. बरं आतां आपण याला विचारावेंच. ( पुढें होऊन सगुणेजवळ येऊन ) अहो, बडे खा साहेब, आपण इकडे एकटेच कोणीकडे चालला आहा ?

**सुगु०**—( स्वगत ) ह्याला मी कोठें जात आहे हें विचारण्याचें कारण काय बरं असेल ? कांहीं असो, आपण कांहीं तरी उडवाउडवी करून याचा खरपूस समाचार घेतलाच पाहिजे. ( उघड ) कोणत्या कामाकरितां ह्मणजे विचारता काय ? आपण ज्या कामासाठीं जाऊन आलांत तेंच काम मलाही करायचं आहे.

**आनं०**–( स्वगत ) ह्या खा साहेबांना मी बादशहाच्या कांहीं कामाकरितां गेलों आहें, असंच वाटत आहे. तेव्हां तें काम कोणतं तें त्याच्याचकडून युक्तीनें काढून घेऊं; ह्मणजे हा कोणत्या कामासाठीं जात आहे तें समजेल. (उघड) काय, काय ह्मणता, अहमदशहाच्या कोणत्या कामाकरितां मी गेलों होतों हें तुह्मांला माहीत आहे ?

**सुगु०**—हो, हो; सांगू कां तुम्ही काय कामगिरी करून आला आहात तें ?

**आनं०**--सांगा, सांगा पाहूं ?

**सुगु०**—आहो, मला माहीत नाहीं कां, तुम्ही मराठ्यांकडील बातमी आणण्यास गेला होता हें. जसं कांहीं तें चोरूनच राहणार. आह्मांला सां-

गितलं तर कांहीं बिघडेल वाटतं ! आपल्या आपल्यांत सुद्धां विश्वास नाहीं आं !

**आनं०**–( स्वगत ) मला हा हेर समजत आहे हें ठीक आहे आणि हाही तें काम करण्यास निघाला आहे ह्मणून मी जें अनुमान केलें तेंही खरेंच होते आहे. असो, मी जरी आपल्या स्वतःच्या कामांक-रितां असा वेश घेतला आहे, तरी आपल्या मातृभूमीचें व जातिबांध-वांचें काम आपणांकडून होईल तितकें केलेंच पाहिजे. आतां हा आमची बातमी तिकडे कळविणार आहे काय ? व मी ह्या नी-चाला तसं करण्याला जिवंत सोडीन काय ? ( अमळ विचार करून ) हो हीच युक्ति करावी. ( उघड ) ऐकूण तुम्हीही हेराचेंच काम करीत अहां ह्मणायचें कांहीं हरकत नाहीं. तुम्ही अशा नीच वेशांनें येऊन आमच्याकडील बातमी घेऊन परत जात असतांना मी जिवंत सोडीन असं कां वाटतं तुह्माला ?

**सुगु०**—( आपल्याशीं ) ह्यानं तर माझं वेशांतर ओळखलं वाटतं, हरकत नाहीं. मलाही त्याला जिवंत सोडू नये अशासाटीं कांहीं तरी कारण पाहिजेच होतं. ( उघड ) आणि तूंही आमच्यांकडील बातमी घेऊन जात असतांना माझ्या हातून जिवत सुटून जाशील अशी कां आशा बाळगतो आहेस ?

**आनं०**—पहातों आतां कोण कोणाला जिवंत सोडतो तें.

**सुगु०**—पहा आतां माझा पराक्रम ( असें ह्मणून कमरेची तल-वार काढून हातांत घेते.

( तोंच आनंदराव पवारही आपली तलवार उपसून एकमेक एकमे-कांवर धावून जातात व एकमेकांचे हातवारे होऊन सुगुणेच्या तलवा-रीचा वार आनंदरावास लागून तो घायाळ होऊन पडतो.)

**आनं०**—झालं, आटोपलं आतां सगळं. माझे सुगुणे—आनंदी, आतां तुझी भेट कशाची ! आणि सुटका तरी कशाची !! नशीब तुझं आणि माझं.

**सुगु०**—( स्वगत ) कांय हा आनंदी आणि सुगुणा अशा माझ्या-

वांहे ! आहो, वेळ आली तर आपल्यांपैकीं एकही वीर आपला पराक्रम, आपलें शौर्य आणि आपलें युद्धनैपुण्य दाखविण्यास कमी करणार नाहीं. पण आमचं ह्मणणं इतकेंच कीं, होता होईल तों असा शोणीताणीचा प्रसंग आणूं नये. युक्तिप्रयुक्तीनें जेवढें काम होईल तेवढें बरें.

राघो०--आनंदराव, कोणत्याही सेनानायकाला तसें तर केलंच पाहिजे. उगीच अविचारानें भलतेंच करून कसें चालणार आहे. मात्र तसें करितांना शूर वीरांना कोणी अपवाद देतील, असें आचरण करूं नये ह्मणजे झालें.

आनं०-दादासाहेब, आपण ह्मणतां तें सर्व आह्मी जाणत आहों. (इतक्यांत अहमदशहाच्या बातमीवर पाठविलेला हेर प्रवेश करून दादासाहेबास मुजरा करितो.)

हेर०-श्रीमंत, अहमदशहानें आपली कडेकोट तयारी करून आपल्याशीं सामना देण्या करितां तो सिद्ध झाला आहे. तेव्हां आपणही आतां बंदोबस्तानें राहून त्यांजवर हल्ले करण्यास लागावें, असें मला वाटतें.

राघो०-कायरे अहमदशहानें आपल्या सैन्याच्या तुकड्या कशा केलेल्या आहेत आणि त्याजवर कोण कोण सरदार नेमिले आहेत हें कांहीं समजलें आहे काय ?

हेर०- हो, हो; मी तो सर्व तपास काढून आणिला आहे. त्यानें आपल्या सैन्याचे चार भाग करून सुजाउद्दवल्याकडील कोणी एक सरदार त्यांजकडे आलेला आहे, त्याला दक्षिणेच्या बाजूवर नेमून एक भाग त्याच्या ताब्यांत दिला आहे. दुसरा भाग वजीर शहावलीखानाकडे देऊन पूर्व बाजू संभाळण्याची व्यवस्था केली आहे तिसरा भाग इतर सरदारांकडे दिला असून उत्तरेची बाजू दाबून धरण्याचें काम त्यांजकडे सोपविलें आहे आणि चवथा भाग त्यानें आपल्याकडे ठेवून तो सर्वांच्या मध्यभागीं राहणार आहे व समय येईल तेव्हां आपल्यावर हल्ला करणार आहे.

राघो०-ठीक आहे. अहमदशहा, तूं कितीही कडेकोट बंदोबस्त केला असलास तरी हा राघू क्षणार्धांत तुझ्या सर्व सैन्याची दाणादाण

करून तुला रसातळाला पोंहचवील ! ( सर्व सरदारांकडे पाहून ) वीर हो, आतां उशीर कशाला. चला घाला आपापल्या समशेरीस हात ! आतांच तुमच्या खऱ्या कर्तव्याची परीक्षा आहे. ह्याच वेळीं मराठ्यांचा प्रताप त्या शिखानष्टांना दाखविण्याचा समय आहे आणि आपला राष्ट्राभिमान, स्वजात्यभिमान स्वकुलाभिमान जागृत ठेवून आपल्या नांवाला लागत असलेला कलंक साफ धुवून पौर्णिमेच्या निर्मल चंद्राप्रमाणें धवलकीर्ति संपादण्याला हाच प्रसंग योग्य आलेला आहे. तुमच्यांतील एकानें जरी कच खाल्ली तरी ही सर्व संधी फुकट जाऊन अखेरीस, पेशव्यांना—नव्हे मराठी राज्याचे संस्थापक शिवाजी महाराज ह्यांना अक्षय अशा काळ्या कुट्ट डबक्यांत तोंड दडवून बसण्याचा काळ येणार आहे. ह्यासाठीं " मरा पण मारा " ह्याच कृतीचा अवलंब तुम्ही सर्वांनीं केला पाहिजे. जर कोणी शत्रूस पाठ दाखवून परत फिरेल, तर सूर्याजी मालुसऱ्याप्रमाणें आपल्याच लोकांना आपल्याच हातानीं यम समसदनास पाठवीन असें सांगण्याचा किंवा प्रत्यक्ष तसें करण्याचा प्रसंग मजवर आणूं नका. मीं तर हाच निश्चय केलेला आहे कीं, एक अहमदशहाचें मुंडकें श्रीमंत नानासाहेब पेशव्यांना दाखवून भाऊसाहेब व विश्वासराव ह्यांना मारल्याच्या पुरा सूड उगवीन, नाहींतर भाऊच्या व विश्वासाच्या भेटीस तरी जाईन.

**बांडे०**—दादासाहेब, आपण भलतीच शंका मनांत आणूं नका. आह्मीही आपल्याप्रमाणेंच निश्चय केला आहे. आमची तर अशी उमेद आहे कीं, पहिल्याच हल्लयास त्या अहमदशहाला धरून आणून आपल्यापुढें हजर करूं,

**राघो०**—नाहीं, नाहीं तें काम तुमच्याकडे ! तें माझें मलाच बजाविलें पाहिजे. भाऊ आणि विश्वास ह्यांना मारल्याचा सूड अहमदशहाच्या नरडीचा घोंट घेऊनच मी उगाविणार आहे.

**शितो०**—तर मग आपण गिलच्यांची जी बाजू कच खाईल असें दिसेल तिकडेच चाल करून जावें, ह्मणजे अहमदशहा त्या बाजूस मदतीस येईल आणि आपल्याला आपला इष्ट हेतु सिद्धीस नेतां येईल.

च नांवानें हाका मारून काय ह्मणत आहे. आनंदराव पवाराकडे निरखून पाहून ) काय ह्यांचा चेहरा तर माझ्या प्रियकरासारखाच दिसत आहे, संशय कशाला. विचारावंच ह्यांना. ( उघड ) काय आपण आनंदराव पवार आहात काय ?

**आनं०**—( दुःखानें ) असेन मी आनंदराव पवार असेन, पण आतां त्याचं काय करायचं आहे. आतां तूं मराठाच आहेस ह्मणून सांगतों कीं, माझं डोकं येथल्या येथेंच धडापासुन वेगळं करून टाक. आणि ही बातमी आपल्या कोणाही मराठेबहाद्दराजवळ बोलूं नकोस.

**सुगु०**—( आनंदरावास चांगलें निरखून पाहून व पूर्ण ओळखून) हायरे माझ्या प्रियकरा, ( असें ह्मणून घट्ट मिठी मारते. )

**आनं०**—हा काय चमत्कार ही माझी लाडकी आनंदी सुगुणा कीं काय ?

**सुगु०**—( दुःखानें ) प्रियकरा, हीच ती दुष्ट अभागी सगुणा. मजसारखी पापिणी ह्या जगांत दुसरी कोणीही नसेल. हा दुष्टे, आपल्याच हातानं आपल्या प्राणपतिचा घात ! देवा असं करण्यापेक्षां त्यांच्याच हातानं माझा इथं अंत केला असतास तर काय वाईट झालं असतं.

**आनं०**—माझ्या सुगुणे—आनंदी, तूं कांहीं घाबरूं नकोस. मला विशेषशी जखम झाली नाहीं. मी हा निंद्य वेश घेतला आणि तो आतां आमच्या मराठेबहाद्दरांना समजून माझी छी, थू होईल ह्मणून माझा अंत करून टाकण्यास सांगितलं होतं पण, आतां तूं आहेस तेव्हां मला कांहीं काळजी राहिली नाहीं.

**सुगु०**—कसंही असलं तरी माझं हें कृत्य दुष्टपणाचंच झालं. ह्या अपराधा—

**आनं०**—नाहीं नाहीं, ह्यांत तुझा अपराध कांहींच नाहीं. मी क्षुद्र बुद्धीनें जें हें वेशांतर केलें त्या अपराधाचें परमेश्वरानें मला हें प्रायःश्चित दिलेलें आहे. हे दीनदयाळा, मी नुसतें वेशांतर केलें तर अशा रीतीनें मला त्याचा दंड मिळाला, मग जे धर्मांतर करीत असतील त्यांना तूं कोणता भयंकर दंड ठेविला असशील. (सुगुणेस उद्देशून)

असो, आतां ह्या समयाला येथें अधिक वेळ बसण्याची सोय नाहीं. कारण ते पहा गिलच्याकडील वीर त्यांची दाणादाण झाल्यानें इकडेच पळत येत आहेत तर मला येथून लवकर घेऊन आपल्या छावणींत चल.

**सुगु०**—ठीक आहे, चला तर आपण ( असें ह्मणून आनंद-राव पवारास उठवून हलके हलके एका बाजूनें जाते तों अहमदशहा व दुसरे एकदोन सरदार दुसऱ्या बाजूनें प्रवेश करतात.

**अह०**—( घाबरल्यासारखे करून ) हिमतखा, चला, पळा लव-कर ! आतां ठीक गति नाहीं. तो दादासाहेब पेशवा माझा कंठनाळ चिरून रक्तपान केल्याशिवाय खास रहात नाहीं.

**हिमतखा०**—हुजूरनीं असें भिण्याचें कारण नाहीं. मराठे किती जरी चवताळले असले, तरी आपण थोडेसें धैर्य धरलें तर आपल्याला फत्ते मिळाल्याबांचून राहणार नाहीं.

**अह०**—फत्ते ! आहो, आतांफ त्ते कशाची ! (बाजूस पाहून गड-बडीनें ) हं, पळा पळा, तो पहा दादासाहेब इकडेच येत आहे. ( असें ह्मणून सर्व पळून जातात. तोंच राघोबादादा व कांहीं सरदार प्रवेश करितात.

**राघो०**—( जोरानें प्रवेश करून ) शाबास माझ्या वीरांनो, तुम्ही आपल्या आजच्या कृतीनें आपलें नांव आर्यभूचे सत्पुत्रांत गोवून ठेविलेंत ! धन्य आहे तुमची ! तुम्ही जर मघाच जोरानें हल्ला केला असता तर माझा इष्ट हेतु तेव्हांच सिद्धीस गेला असता. असो, आतां सर्वांनीं एकदाच अशी चाल करून गेलें पाहिजे कीं, त्यासरसे ते शिखानष्ट सैरावैरा धांवत सुटले पाहिजेत किंवा आपल्याला शरण तरी आले पाहिजेत.

**एक सरदार०**—ते आपल्याला पाठ दाखवून पळू लागले कीं, त्यांच्या पाठीवर चाल करून जाऊन एकसहा त्यांची कत्तल उडविली पाहिजे.

**राघो०**—छे, छे, असें करूं नका ते पळून जाऊं लागले तर त्यांना खुशाल पळून जाऊंद्या, आणि शरण येतील त्यांना कैद करून चांगल्या बंदोबस्तानें ठेवा. निष्कारण रक्तपात करूं नका. मला त्या

सर्वांचे प्राण घेण्याची मुळींच इच्छा नाहीं. फक्त त्या अहमदशहाचा कंठ चरचर चिरून माझे हात लाल झालेले मी पाहिलें ह्मणजे माझ्या भाऊच्या व विश्वासाच्या मृत्यूचा मी सूड घेतला असें म्हणेन. बरं आहे आतां जास्त वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. चला निघा वायू-वेगानें! ह्मणा हरहर महादेव! करा शिवाजी महाराजांचें स्मरण! (असें म्हणून सर्व सरदारासह हरहर महादेव ह्मणून ओरडत निघून जातात. आंत बंदुकांचे बार होतात व बोलो दीन! दीन! व ह्मणा हरहर महादेव! असा एकच रणघोष होतो. इतक्यांत एक रजपूत सरदार प्रवेश करून रंगभूमीवरून दुसऱ्या बाजुस जातांना)

**रजपूत०**—हं, हं; दादासाहेब, हें काय? आपण ब्राह्मण असून रक्तपान करता कीं काय? (असें ह्मणून आंत जाऊन रक्तानें हात व कपडे लाल झाले आहेत अशा दादासाहेबास घेऊन येतो. तों कांहीं सरदार येतात, त्यांचेकडे पाहून)

**राघो०**—झाली, झाली माझी प्रतिज्ञा पुरी! वीरहो, आपण आज मराठ्यांच्या नांवाला लागत असलेला कलंक साफ धुवून काढून आपल्या विमलकीर्तीचा ध्वज भूमंडलावर फडकविलात! धन्य! धन्य तुमची! तुमचा हा पराक्रम पाहून आपल्या राज्याचे संस्थापक शिवराय, मराठी राज्याचा अभिमान वाहणारे आमचे वडील, तसेंच स्वधर्माची, स्वराष्ट्राची व स्वकीर्तीची उन्नति करूं इच्छिणारे भाऊसाहेब, विश्वासराव आणि रणशूर तानाजी व सूर्याजी मालुसरे, बाजी देशपांडे, जनकोजी शिंदे, इत्यादींकांचे तळमळत असलेले आत्म्यांना स्वर्गलोकीं आनंद होऊन ते प्रेमानें तुमचेकडे पहात असतील! असो, माझ्या क्रोधाचे आवेशांत ब्राह्मणाला अनुचित असें रक्तपानाचें काम मजकडून होत होतें पण (रजपूत शिपायाकडे पाहून) तुम्ही मला त्यापासून पराङ्मुख केलें, याबद्दल हें घ्या तुम्हाला बक्षीस (असें ह्मणून गळ्यांतील पेंडें त्याला देतो व पुनः सर्व सरदाराकडे पाहून) ठीक आहे, आतां आपल्याला ज्या दयाघन परमेश्वराचे कृपाप्रसादानें विजय प्राप्त झाला, त्याचे नांवानें करा त्रिवार जयघोष! (असें ह्मणून सर्व सरदारासह हरहर महादेव असा जयघोष करितात. तों पडदा पडतो.)

समाप्त.